सत्कार्योत्तेजक सभा–धुळें

श्री

रामदास आणि रामदासी

ग्रन्थमाला

भाग एकोणविसावा

# श्री संप्रदायाचीं कागदपत्रें

द्वितीय खंड



किंमत रु. २

सत्कार्योत्तेजक सभा—धुळें

[ श्रीरामदास आणि रामदासी मासिक पुस्तकांत प्रसिद्ध झालेला ]

श्री

# रामदास आणि रामदासी
## भाग एकोणविसावा

सर दुसरा ] [ मणि आठवा

# श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें
## द्वितीय खंड

धर्म स्थापनेचे नर । ते विष्णूचे अवतार ।
कीर्ति वाढे निरंतर । विश्वतो मुखीं ॥

ह्या ग्रन्थ शंकर श्रीकृष्ण देव यांनीं धुळें येथें आपल्या श्री आत्माराम छापखान्यांत छापून धुळें येथें प्रसिद्ध केला



१८४२ चैत्र शुद्ध १

किंमत दोन रुपये

# श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें

## द्वितीय खंड



## अनुक्रमणिका

॥ श्रीराम ॥

# श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें

## द्वितीय खंड

---

# दोन च शब्द

---

अनुर्वाच्य सुख बाणे । अनुभवी तो चि जाणे ॥

या कागदपत्रांचा काय उपयोग, असा प्रश्न अजून हि पुष्कळांना पडतो. त्याचें थोडक्यांत उत्तर इतकें च कीं, त्यांच्या योगानें जास्त संशोधन कोठें करावें याचा मार्ग दिसतो, तत्कालीन स्थितीची कल्पना होते, पूर्वजांचें पुण्यस्वरूप प्रतीत होतें, सद्य:स्थितीचा कांहीं काळ विसर पडून मनाला आनंद होतो, इत्यादि. अनुभव घेऊन पहावा. या खंडांतील कागदपत्रांचा याहून जास्त प्रपंच करणें तो पुढें मागें आपण करूं किंवा दुसरा कोणी तरी त्यांचा भोक्ता करील.

कागदपत्रांच्या पहिल्या खंडांत नऊ घराण्यांचीं व या खंडांत पांच घराण्यांचीं मिळून चवदा घराण्यांचीं कागदपत्रें आतांपर्यंत प्रसिद्ध झालीं आहेत. आतां तिसरा खंड चाफळचें दप्तर म्हणून छापावयास घेत आहोंत.

धुळें–१८४२ चैत्र शुद्ध १



# श्रीसद्गुरुस्तवन

## पद

वाचे राम राम बोला

शेष श्रमला श्रुति । म्हणती नेति नेति ।
काय करूं मी स्तुती । मंदमती ॥ १ ॥

धन्य सद्गुरु रामा । मज न कळे तुझा महिमा ।
सीमा चि होती निसीमा । पुराण पुरुषोत्तमा ॥ धु० ॥

ब्रह्मा विष्णु हर । त्याहूनि परात्पर ।
विश्रांतीची थार । मायेविण माहेर ॥ २ ॥

सद्भाविकाला फळला । थोर लाभ जाला ।
अनुभव हा सज्जनाला । वाचे राम राम बोला ॥ ३ ॥

नाम वदतां वाचे । पद लाभे स्वामीचें ।
धाम चि कल्याणाचें । तपफळ जन्मजन्मांतरींचें ॥ ४ ॥



श्री

# रामदास आणि रामदासी

## भाग एकोणविसावा

# श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें

## द्वितीय खंड

## डोमगांव-मठ, वगैरे

**लेखांक ४२१ ]** १५५८ भाद्रपद वद्य १० **[ नक्कल-मोडी**

हा व पुढचा असे दोन लेखांक मौजे बाहे येथील कुळकर्णीवतनासंबंधानें आहेत. बाह्याच्या वतनाचे कागद डोमगांवी कां जावेत हें नक्की सांगतां येत नाहीं; तथापि असें असण्याचा संभव आहे कीं, श्रीकल्याणस्वामींच्या बरोबर किंवा नंतर जी मंडळी डोमगांवीं गेली त्यांत बाह्याच्या कुळकर्ण्यांपैकीं कोणी असावेत.

तालिक

बीहुजुर कारकुनानी ता। वाळवे

पढरी रघुनाथ हवालदार तिमाजी नागनाथ मजमदार

राहुजी कोनेरी निश्चेवन

॥ ली

श्री शके १५५८ वरुशे धातानाम सवछरे भाद्रप(द) वदी दसमी मगळवार सुहुर सन सबा सलासीन वा अलफ छ २२ माहे राबिलाखर तदिनी नारो माहादेउ रुगवेदी मोकाम मौजे उरण गोसावीयासि खंडो तुलारस वा माहादोवा माध्याजन कुलकर्णी मौजे बाहे तां वाळवे लिहीहून दिल्हे पत्र यैसे जे मौजे मजकुरीचे कुळकर्ण खात आसतां दरिवष्ट सालमजकूर कोनेरी गोळक येऊन उभा राहिला की मौजे मजकु-

रचे कुलकर्ण आपले ह्मणोन टाणे तो मा। मालुम केले जे साहेबी मुनसफी करून दुबाला केलिया सेरिणी होन ५०८ देईन ह्मणोन मग सदरहु मिरासीचे मुनसफी बदल मौजे मजकुरीचे पटेल वा। कुळवाडी यांसि हुजूर बोलाऊन सदरहु बयांज पुसतां बोलो लागले की कोनेरी गोळकास मिरासीस निसबत नाही खंडोबा वा माहादोबा कुलकर्णी हे मिरासी पिडी दर पीडीचे आहेत यैसे बोलिलेवरी आपले बाबे देस-कानी साहेबाचे बदगीस अर्ज केले की खंडोबा वा माहादोबा हे मिरासी कुलकर्णी आहेती साहेबी यासि हाती धरून याचे मिरासी याचे दुबाला केले पांहिजे कोनेरीकयानी दखल करून होन ५०८ कबूल केले आहेती तें चि पैके खंडोवा वा माहादोवा कबूल करून आपली मिरासी खांईल ह्मणौन बराये मालुमातीनु मिरासी बावाल खांतिरेसी आणोन मौजे मजकूर कुलकर्ण आपले दुबाला केले ते अपण होन ५०८ सेरणी कबूल केले ते अपणासी द्यावियां मत्रसर नाही मग अपण आपले अत्मसतोसे कुलकर्णाची निमे तकसीम तुह्मासी विकत खंडून दिल्हे किमती होनु १३५ बी ता।

| | |
|---|---|
| यैन होनु | बदल माहजर वा पा। ता। मजकूर |
| १०० | होनु ३५८ |

दिले असे कुलकर्णीचे हाक लांजिमा इनाम वा पांळक वा पटीपछोडी वा गांउडमोट व उकाला व तंमाम जो काये हाक मिरासीचा निमे तुह्मी खांणे आपले सतोसे दिल्हे आसे वृतीस पेस्तर जे काये सांधली ते दोनी ठांई खाणे जे मिरासी समधे पडेल ते दोनी ठांई सोसावे वा आपला डाईज गोत्रज वां दादभाई हरकोणी उभा राहील लागलिगाड करील त्यासी आपण निवांराये तुह्मास कांही समधे नाही तुह्मास आपण आपले वृत्तीभांउ केले असे तुह्मी आह्मी संतोसे कुलकर्ण दो ठाइ खांऊन सुखरूप असावे यास चुको तरी आपले वडिलाचे सुक्रतं असे बी॥ खंडो तुलारसं वां माहादोबा कुलकर्णी मौजे मजकूर

बी हुजुर

गोही

चांदखांन सर गुरो
दतो सुरो निसीदा मौजे मजकुर
अतो वेकटाद्रि नाडिगौडा
कबीर नाइक नाइकवाडी ठाणा ताा मजकूर
सेखभाई मुलाणा मौजे मजकूर
जखसेटी बकाल मौजे मजकूर
तिमणभट जोसी मौजे मजकूर
रुपांजी कडेगाउकर

बापुजी सबनिवीस ताा मजकूर बीाानु
तुकोजी सिंदे देसाई ठाणा ताा मजकूर वां खंडोजी घोरपडे देसाइ वा माहादो बलाळ देसकुलकर्णी ताा मजकूर
बुबाई पाटलीण मौजे मजकूर
पदमोजी पटेल मौजे मजकूर
बाळंभट जोसी मौजे मजकूर
विठोजी क्षेत्री मौजे मजकूर
लखमोजी कानोजी चौगला मौजे मजकूर
येको गावडा धणगर मौजे मजकूर

बडवेयांनी

राउजी बडवा
कोनेरी बडावा

सबुबडवा
तिमाजी बडवा

मोतरफेयानी

तुको मेहतरी साली

नेमसेटी दरजी

बलुतेयानी

तीमं सुतार
जना चाभार
बेगारी हैसा
लखमा वेसराखां
बाबा बेगारी

सोना हजाम व येमा हजाम
माला नाटीकर
लखु कुंभार
भांगोजी आत्री

[1] कोनेरी गोळकानें वृथा तकार केल्यामुळें खंडोबा महादोबा यजुर्वेदी यांना ५० होनांचा गुरदंड पडला. तो देण्यासाठीं त्यांनीं निमे वतन

उरणाचे नारो महादेव ऋग्वेदी यांस विकलें. बाह्याच्या मारुतीची पूजा गोळकांकडे आहे, ते न जाणों, कोनेरी गोळकांचे च वंशज असावेत.

---

**लेखांक ४२२ ]** १५५८ आश्विन शुद्ध २ **[ नक्कल-मोडी**

तांलिक

मांहाजर ब तारीखं १ माहे जमादिलोवल बी हुजुर हाजिरानी तपे वालवे

कांरकुनांनी

राजेश्री पढरी रघुनाथ पडीत तिमाजी नागनाथ मुजमदार
ठाणेदार बापुजी कामाजी सबनीस
रावजी कोनेरी निघेवान बीकलमनु

नाइकवाडीयांनी

जलालखान बीन इस्मालखान बीन बाब्राजी नाइक आब्राजी नाइक
चादखान दौलतखान नरसं नाइक
सिळार नाइक कबीर नाइक

देसमुखांनी

तुकोजी सीदे वां खंडोजी घोरपडे माहादांजी बलाल देसकुलकर्णी
देसाई बीकाानु
अतो वेकटांद्रि खंडेराउ नाडगौवडा

सेटियांनी वा माहाजननानी

पां सेटी सेटीयां बसवलिग माहाजन नागसेटी वाजोला विस्वनाथ नाइक

मोकदमानी देहाये

कसबा मौजे उरण

बापोजी पांा कुडो व खेळोजी पांा वा येमाजी जासोजी नागनाथ कु-
कलबा भौरोजी पांा पांा वा गोजा पांटील लकर्णी

सवासी
महादो बलाळ कुळकर्णी

वांकोजी चौगला
जावजी अर्जुन
मुलाद म्हैसकर

मौजे कामेरी

भैरोजी वा बापजी पां।
सुकोजी पां।
जससेटी हणमसेटी चौगला
नरसु गिरमाजी कुलकर्णी
रुद्राजी पां। कुलकर्णी

मौजे फुगदी

जाखोजी वा मोतजी वा चिलोजी पटेल
विठोवा कुलकर्णी

मौजे पाटनुस

रावजी वां दादजी पटेल
बांरमाजी देवजी कुलकर्णी

मौजे कुडाळ

येलजी पां। वा रुद्राजी पां।
नारोवा कुलकर्णी

मौजे नागठाणे

रामजी पटेल नागोजी
आपाजी कुलकर्णी

मौजे गोटखीडी

कोडजी वा राउजी पटेल
नरससेटी कुलकर्णी
जाउजी चौगला

मौजे खेड

हणगोजी पां। विठोजी कुलकर्णी

मौजे बाहे

बुबाई पटेलिणी वा पदमोजी पां। वा खलो पेइगुडा पटेल राउजी चौगला तिमण भट व बाळभट जोसी
विठोजी क्षेत्री मोकदम
म्हैसा बेगारी येमा हाजाम
तिमाजी रूपाजी कडेगाउ
रावजी वा तिमाजी बडवा
येमा तराल लजु कुभार

संमस्त हाजिरानी तंपे मजकूर सुा। सन सबा सलासीन अलफ कारणे जाहाले माहाजर ऐसे जे नारो माहादेउ कुलकर्णी मौजे बाहे यांसी माहादोबा बीन दाकोवा वां खंडोवां बिन तुकोवां कुलकर्णी मौजे मजकूर यांनी आपुले कुलकर्ण निमे तकसीम वाटून विकत नारो माहादेउवासी दिले

जे सबब पेसजी आपणासी ठांणामधे करारती बाधले ते द्यावियां मव-सर नाही वां कर्जवामं लोकाचे तगादा लागले वां पोटासी खांवियां नाहीं आपुले वडिल वडिल मंयेत जाहाले आपण नेणेती मुले आपणा-च्याने दिवाण कारबार न चलवे ह्मणोन मौजे मजकूरचे पटेल वां मोक-दमासी सागितले मग मौजे मजकूरीचे पटेल वा मोकदम वा अपण जाऊन नारो माहादेउ यांसि खांतेरेनिशानी करून अपुले आत्मसतोसे निमे तकसीम विकत खडून दिले ते खंबर ठाणेसी दखल जाहाले मग साहेबी हुजुर बोलावून तश्रीफ देऊन सेर्णी देणे ह्मणवून रजा फर्मा-विले मग अपुले बाबे देसकानी तपे मजकूर इलतमस केले जे नफर मजकुरापांसी सेर्णी घेऊन माहजर वा मिसली करून देणे ह्मणऊन बराये मालुमाती खांतिरेसी अणऊन नारो माहादेउवासी सेर्णी घेऊन मौजे मजकूरीचे कुलकर्ण निमे तकसीम मोकरार करून दिले असे तरी मौजे मजकूरीचे कुलकर्णीकीचे निमे तकसीम नारो माहादेउ वा निमे तकसीम खंडोवा वा महादोवा यैसे सीस्त करून हकलाजिमा वा पटिपछोडी वा इनामती वा ठिकणाती वा पांळक वा मेटकुडो वा उकाला वा बाजे जे काये असेल ते दोनी तकसीमा दोघानी खांऊन दिवाण नफराई करून सुखे आसिजे मौजे मजकुरीचे कुलकर्णगी मिरासी सदरहु सीस्त प्रो लेकुराचे लेकुरी खडून दिले असे दोघानी मिळऊन कुलकीर्णीकी चालऊन अपुले हक वां लाजिमा पंटीपछोडी वा मेटकुडो वा बलुते बाजे जे काये असल ते जराबजरा वाटून खाऊन असावे पान वा मान माननुक वा तश्रीफ पैहिले खडोवा वा माहादोवां बाजदं नारो माहादेउ यैसे सीस्त केले असे सदरहु प्रमाणे हरदोजणानी येकमेकासी कागद लेहून दिले असे हे माहाजर सही

त्या काळीं गांवोगांवचे लोक आपआपला व्यवहार किती शिस्तीनें व सलोख्यानें पहात, याची साक्ष या महजरावरून उत्कृष्ट पटते.

---

**लेखांक ४२३ ]** **१६१० माघ शुद्ध ५** **[ अस्सल-मोडी**

हा व पुढील लेखांक, परंडे सुभ्यातील मौजे सेवरे गांव १६१० पूर्वी वीस वर्षे ओसाड पडलें होतें, तें पुनरपि वसविण्यासंबधानें आहेत. डोमगांव हि परंडे सुभ्यांत च तेव्हां होतें व हल्लीं आहे, तेव्हां हे दोन कागद डोमगांवीं मिळावेत हें साहाजिक आहे.




गोपाळराम दिवाण




खंडोजी राउ
राऊ अमीन




देवराऊ अमीन




सुंदरपत ठेक
दार

गोही

देसमुख मामले परंडे

(निशाणी नांगर) चतरोजी गगाजी सावाजी रुद्राजी

(फारसी दोन ओळी)

सके १६१० विभवनाम सवछरे माघ सुध पंचमी बुधवार त दिवसीं महजरनामा ऐसा जे सुभानजी बिन माणकोजी इबिन विठोजी कळारे मोकदम मौजे नालगाउ पा हवेली यास पिराजी व सुभानजी देसमुख व दासोजी व नरसोजी देसपाडे पा टेभुर्णी सुा सन हजार १०९८ कारणे महजर करुनु दिघला ऐसा जे तुह्मास मौजे सेवरे पा मजकूर

तेथी(ल) मोकदमी निमे मिरासीदारास ठेविले यास मिरासीदार हाजीर नाही मिरासदार हाजीर जाहालीयावरी निमे मोकदमी त्याचे हवाला करणे यास वाटणी तरफ २ निमे पाढरी तरफ दो ठाई घेणे काली जमीन दुमला चावर २६॥० पैकी निमे तरफ सिव मालेगाउ मिरासीदार तुह्मास निमे चावर १३। सिव लीवलीनगुरलीचे सवा तेरा चावर तरफ करुनु दिधली असे तुह्मास व त्यासी काही कथला नाही जमीन सकर निखर वाटून घेणे तुमचे खुद तरफे पैकी तुह्मास इनाम चावर थळ जाबुलबेटपैकी चावर ।॥। निम दिधले असे हे खाउनु गावाची कीर्दी आबादानी करणे हे महजर सही हे लिहिले आहे ते तुमचे लेकराचे लेकरी चालुनु यास अनसारीख करून तरी अपले देवाची वडिलाची आण असे हे इमान दा। दासोजी व नरसोजी देसपाडे पा। मा।र




गा।ही

तुकोजी देसमुख पा। वा। कृस्णाजी येसाजी देसपाडे पा। वा।

मोकदम रावली

मोकदम मौजे डोणजे संताजी मोकदम मौजे भोसर संताजी मोकदम मौजे जवले

येसाजी मोकदम मौजे चिचणुर सी।। सीगोजी पा। मोकदम मौजे सळगाव

"कलारे" ऐवजीं पुढील लेखांकांत "कराळे" आहे. मौजे सेवरे गांवाची कीर्दी आबादानी व्हावी ह्मणून परगणे टेंभुर्णी सुभा परंडा येथील देशमुख व देशपांडे यांनीं मौजे नालगाऊ पा। हवेली येथील दोघांस हा महजर करून दिला. पूर्वींचा मोकदम मिरासीदार परागंदा जाहला होता, तरी त्याच्यासाठीं अर्धी मिरासी राखून ठेवून अर्धी या दोघांना दिली.

**लेखांक ४२४ ]** १६१० माघ **[ नक्कल-मोडी**

ई कौलनामा पीराजी व सुभानजी देसमुख व दासोजी व नरसोजी देसपाडे पा। टेभुर्णी तां सुभानजी बीन माणकोजी ईबीन वीठोजी

( नांगराची निशाणी ) कराळे मोकदम मौजे

दा। दासोजी व नरसोजी देसपाडे पा। मा। नालगाऊ पा। हवेली

व नरहरी लुमाजी

कुलकर्णी मौजे पीपळदुठे पा। टेभुर्णी सा। परडा सन १०९८ कारणे बाबे कौलनामा ऐसा जे मौजे सेवरे पा। मार तेथील नीमे मोकदमी व नीमे कुलकर्ण मिरासी करून दिधले सबब मौजे माजकूर वीस साले वैरान पडिले अहे त्याची जमा परगणीयावरी मु(र)डी घालून देता परगणा हि खराब पडिला ऐसीयास सा। मजकुराकारणे साहीबी अवकात खातिरेसी आणून कौल दिल्हा की पा। मजकूर देहबदेही आबादानी होवी ह्मणौउन कौल दिधला यासी लावणीचे वख्ती अह्मी व देहाये मोकदमी मिळोन तलास केला अमा मोकदम व कुलकर्णी कोणी हाजीर नव्हेती गाव खराब पडिला जमाबंदीचे वख्ती अह्मी देहाये मोकदम यासी विचारीले की वैरान गावाचा टका तुह्मी देणे अह्मास साहेबी पैकीयाचे व लावणी तगादा लाऊन बैसवी( ले ) यास काये इलाज करावा त्यास मोकदमी जाब दिधला की अजीवरी अपणे गावाचीया मुरडी देऊन खराब जाहालो आपली काही अवकाती राहिली नाही ऐसे साहेबे खातीरेसी आणून सालमजकुराकारणे कौल दिल्हा तेणे प्रमाणे अपण टका जमीन दुमलीयावरी वरगत करून जो हिसेब येईल तो देऊन याखेरीज अपणास देवत नाही पडि( ल ) गाव त्याची वतने विकून पैके देणे व पुढे पेस्तर सालाकारणे लावणी करवणे ह्मणौउन देहाये मोकदमी जाब दिल्हा त्यावरून हकीमे जोर ताकीद केली मग अह्मी तुमच्या गळा पडोन मौजे मजकुरी नीमे मोकदमी व नीमे कुलकर्ण देऊन तुह्मास वतनदार करून मौजे मजकुरीचा वसूल साल मजकुराकारणे करविला

व पेस्तर सालाची लावणी बा। इस्तावा साले ४ भरून जमाबंदी बा। होनु २९३ ।।।≈ बी।।

सन १०९९ सन ११०० सन ११०१ सन ११०२
होन ७५ होन १५० होनु २२५ होन २९३।।।≈
सदरहू प्रमाणे तुह्मास कौल दिल्हा असे तेणे प्रमाणे कीर्दी अबादानी करणे व सालमजकुरींची जमा माफीक वरगत रुा ९५३८ नवसे त्रीपन तुह्मापासून घेऊन पेस्तर सदरहूप्रमाणे कौल दिधला असे तेणे प्रमाणे तुमचे ( क )डे चालऊन कोणे बाबे मुलाहिजा न धरणे लेकराचे लेकरी नीमे वतन खाऊन मजकुरींची कीर्दी अबादानी करून सुखे असणे दरीबाब कौल असे

तेरीख माहे रबिलाखर

त्या च देशमुखदेशपांड्यांना हा कौलनामा करून दिला आहे. मागील महजरांत कुळकर्णीवतनाचा उल्लेख नव्हता. या कौलनाम्यानें त्या दोघांना जशी सेवरे गांवची अर्धी मोकदमिरासी दिली तसें अर्धे कुळकर्णीवतन मौजे पिंपळदुटे येथील कुळकर्ण्यास दिलें आहे. दुष्काळानें ह्मणा किंवा शत्रुसैन्याची टोळधाड येऊन गांवें कशीं वैराण पडत व त्यांची पुन्हा आबादानी कशी करीत, याचें ज्ञान या दोन लेखांकांवरून होण्यासारखें आहे.

---

**लेखांक ४२५ ] १६२० [ अनिश्चित-बाळबोध**

डोमगांवमठांत श्रीमत् दासबोधाची जी सोनेरीरुपेरी प्रत आहे तिच्या संबंधानें हें पत्र दिसतें. ती प्रत कल्याणशिष्य केशव यांच्या हातची असून १६२० त लिहिलेली आहे. उंबरजमठपति केशव ते च हे, कां नगर जिल्ह्यांतील कर्जत येथें आणखी निराळे केशव होते, हें निश्चयानें सांगतां येत नाहीं. आज मित्तीस तरी कर्जत येथें मठ नाहीं असा शोध लागतो.

श्रीराम

श्रीमत्कल्याणांकीत केशवनाम्नेन स्नेहपुर्वक मुद्गल गोसावीयास आसीर्वाद उपरी तुह्मांकडील वर्तमान सागीतलें त्यावरून समाधान जालें यानंतर श्रीदासबोध पाठवीला आहे तो बहुत यत्नें जतन करणें क्षणक्षणा कोणास सोडु न देणें कृष्णाजी गोसावियानें वर्तमान सागीतले त्यावरून समाधान जालें ॥ पुस्तक यासमागमें पाठविलें आहे बहु यत्नें संरक्षण करुन नित्य पुजा करीत जाणें पुंसी यात्रेकारणे दोघे गोसावी पाठऊन देणें श्री तीर्थीकारणें आह्मी तेथें येतों ॥ समस्तास आसीर्वाद सांगणें हा आसीर्वाद ॥ ॐ

प्रत बहुत यत्नें जतन करणें, वारंवार कोणास सोडूं न देणें, तिची नित्य पूजा करीत जाणें, इत्यादि सूचनांवरून हें पत्र त्या सोनेरी-रुपेरी प्रतीविषयीं च असावें, याबद्दल शंका राहत नाहीं. प्रत तशी च पूजार्ह आहे. तिची जास्त माहिती ग्रन्थराजाच्या तिसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत दिलेली आहे. १६२० तील ती प्रत आहे, ह्मणून हें पत्र दि १६२० तील च असावें, असें ह्मणतां येत नाहीं. किंबहुना तें १६३६ नंतरचें असावें; कारण त्यापूर्वी तें खुद्द कल्याणांना न लिहितां त्यांच्या पश्चात् झालेले मठपति मुद्गल यांना लिहिण्याचें कारण नव्हतें. पौष्य महिन्यांतली यात्रा कोणती तिचा बोध होत नाहीं.

---

लेखांक ४२६ ] १६३३ श्रावण वद्य ४ [ अस्सल-मोडी

मौजे गोंडरें व डोंवगांव हीं दोन गांवें श्री शाहु छत्रपति यांनीं श्री कल्याणस्वामीस इनाम दिलीं होतीं, तत्संबंधीं हें पत्र आहे.

श्री

राजश्री कमावीसदार सरदेशमुखी प्रात परडें गोसावीयासि

ॐ

अखडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य सेवक नारो प्रल्हाद आ

सरदेशमुख सुा इसने अशर मया अलफ राजश्री कल्याण गोसावी




यास इनाम गाव ताा हवेली परर्डे हुजरून राजश्री स्वामीने दिल्हे

| मौजे गोडरे | डोबगाव |
|---|---|
| १ | १ |

येकूण दोनी गाव अहेती सनद अलाहिदा अहे त्याप्रमाणे तुह्मी दोनी गावी गोसावीयाकडे चालवणे अजार लागे न देणे जाणिजे राा छ १८ जमादिलाखर




---

लेखांक ४२७ ] १६३६ पूर्व [ अस्सल-बाळबोध

शिवछत्रपति, शंभुछत्रपति, राजाराम छत्रपति व शाहुछत्रपति यांचे अष्ट प्रधान परंपरेनें श्री सांप्रदायिक होते. रामचंद्र नीळकंट अमात्य यांचा तर या संप्रदायाशीं विशेष निकट संबंध होता. वास्तविक गगनबावड्यास अमात्यांच्या कडे सांप्रदायिक पुष्कळ कागद असावेत व असतील हि. अजून हि गगनबावडेकर आपली गुरुपरंपरा विसरले नाहींत. तेव्हां त्यांनीं आपल्या दप्तरीं या दृष्टीनें शोध केला पाहिजे.

श्रीरामसमर्थ

सत्यस्वरूप निर्विकार । जालें तदाकार अंतर ॥ आणि सगुण साक्षात्कार । निरंतर ॥ १ ॥ ऐसे जे साधु भले ॥ श्रीस्वामि समागम लाधले ॥ त्यांचे वंदितां पावले ॥ घडे अलभ्य लाभ ॥ २ ॥ त्यांचें

वर्णावें स्वरूप ॥ तरि ते नित्य कल्याणरूप ॥ स्मरणमात्रें प्राणी अमूप ॥ तरती भवसागरीं ॥ ३ ॥ त्यांच्या कृपावलोकनें ॥ अक्षइ सुख लाधणें ॥ त्यांची कृपा होणें ॥ पूर्वपुण्येंकरूनी ॥ ४ ॥ ऐसे जे सज्जन त्यांचें करितां चिंतन ॥ तेणें होइजे धन्य इह आणि परत्रीं ॥५॥

राजमान्य राजेश्री कल्याण गोसांवि स्वामींचे सेवेसि

पोष्य रामचंद्र नीळकंठ कृतानेक साष्टांग नमस्कार विनती उपरी आपले दयेकरून फाल्गुन वद्य अष्टमी पर्यंत सुखरूप असों यानंतर आपण कोंडाजी गोसांवि याबराबरि पत्र पाठविलें तें उत्तम समई पाहून परम समाधान जालें यैसें चि प्रतिक्षणी परामृपास अंतराय केला न पाहिजे या प्रांतें आपलें आगमन अनायासें जालें होतें दर्शनाचा हेत अत्यंत चित्तांत होता परंतु घडोन आला नाहीं बरें श्रीचे इछेस जे समइ पुरवायाचा येइल ते समइं पुरवील राजेश्री शिवाजी गोसांवि यांची ही भेटि जाली त्याणी सविस्तर वर्त्तमान सांगीतलें आपलें स्मरण चितांत अहर्णिसीं आहे आपण लिहिलें जे राजकी प्रसंगाकरितां विस्मरण जालें तरि आवघा प्रसंग स्वामीच्या कृपेचा आहे तेथें विशेष काय ल्याहावें कृपालोभ आसों दीजे हे विनंती ॥

[ किती गोड पत्र आहे. तें खुद्द रामचंद्र नीळकंठांनीं साक्षात् कल्याणांना लिहिलेलें आहे. मायन्यांतील पांच ओव्या वाचतां वाचतां सहज पाठ होतात. अमात्यांची श्रीचरणीं केवढी निष्ठा होती ! कल्याणांनीं कोंडाजी गोसावियांबरोबर पाठविलेलें पत्र वावडेकरांकडे असावयास पाहिजे. शिवाजी गोसावी ह्मणजे बहुधा आपचंद-मठपति शिवराम स्वामी होत. त्यांना व्यवहारांत शिवाजी ह्मणत. पत्रांत उल्लेखिलेला "राजकी प्रसंग" राजाराममहाराजांच्या कारकीर्दीतील घोर प्रसंगाव्यतिरिक्त दुसरा कोणता असणार ?

**लेखांक ४२८ ]** १६३६ पूर्व **[ अस्सल-बाळबोध**

| या पत्राला जो कागद वापरला आहे तो मौल्यवान् आहे. कागदा-
| वर सोनेरी छिडकाव आहे. लेखकाचा पूज्यभाव दर्शविण्यासाठी
| असला कागद त्या वेळीं वापरला जात असे.

श्रीराम

तीर्थरूप राजमान्ये वीस्वमान्ये यौगनिधी राजेश्री बावा स्वामी वडीलाचे सेवसी चे

रणरज यादवान चेरणावरी मस्तक ठेउनि सास्टांग नमस्कार विनती उपरी येथील वर्तमान कार्तीक वदि त्रयोदसी परीयेंत सुखरूप आसो वीषश दया करूनि पत्र पाठविलें तें पावले परम समाधान जालें त्यात आज्ञा केली तें मस्तकी वंदीली आपण दास आहोंत सेवा करावी हे ची आमची कर्मगती आहे परंतु दया घडविल सेवसी रुा २५ पंच-वीस पाठवीले आहेत व पुढे ही उरला हीसेब पावता करूं दास आहोंत आंतर न पडे बहुत + त लीहीन नलगे वरकड वर्त्तमान रा रुद्रापा गो। सांगतां विदि होईल हे वीनंती

| बावा ह्मणजे कल्याणस्वामी व यादव ह्मणून कोणी त्यांचे शिष्य
| असावेत.

---

**लेखांक ४२९** १६३६ नंतर **[ अस्सल-बाळबोध**

| श्रीकल्याण व दत्तात्रय असे उभयता बंधु होत. वडील कल्याण
| व धाकटे दत्तात्रय. दत्तात्रयांचे वास्तव्य चाफळजवळ शिरगांवी
| असे. कल्याणांचे शिष्य जगन्नाथ हे तडवळेमठपति होत. कल्या-
| णांच्या निधनानंतर डोमगांवीं मठपति कोणास करावें, यासंबंधानें
| दत्तात्रयांनीं जगन्नाथांना हें पत्र लिहिलेलें आहे.

श्रीरामसमर्थ

ती। बावां

मोक्षश्रीयावीराजीत श्रीगुरुभक्तीपरायण राजमान्ये राजेश्री जगंनाथ

गोसावीं यांप्रती दत्तात्रय नान्मे आसीर्वाद उपेरी तुह्मी परमार्थामधे थोर महंत आहांत तरी समस्त महंतमंडळी मेळउनि तीर्थरूपा चे स्थळींची भजनविधी चालोन कीर्तीची वृधी करणें यक पुरुष योजीला आहे त्या स्थळायोग्य आणी वडीलांच्या ही चीत्तांत हे च होतें ते आवघें आह्मी आनंत गोसावी यास सांगीतलें आहे ते सांगतां श्रुत होइल बहुत ल्याहावे तरी तुह्मी सुज्ञ आसां समस्त महंताची मंडळी व सन्नीधवासी यांसी आसीर्वाद

तीा बावा=तीर्थस्वरूप कल्याण बावा. कल्याणांच्या हयातींत आणि पश्चात् जगन्नाथांनी डोमगांव मठाची उत्कृष्ट सेवा केली होती. कोणता पुरुष योजिला होता त्याचा पत्रांत नामनिर्देश नसल्यामुळें मुद्गलस्वामीविषयी च हा उल्लेख असावा, असें नुसतें अनुमान आहे.

लेखांक ४३० ] १६३७ चैत्र शु. १५ [ अस्सल-मोडी

परंड्याच्या देशमुखांनी कल्याणस्वामींस साकरविहीर नांवाचा एक मळा व इतर जमीन इनाम करून दिल्याबद्दलचें हे दानपत्र आहे.

( फारसी शिक्का )

( फारसी मजकूराच्या अकरा ओळी )

दानपत्र सके १६३७ मनमथनाम सवछरे चैत्र सुध पुर्नमा गुरुवार ते दिवसी माहाराज राजश्री कलियान बावा गोसावी रामदासी हली वस्ती कसबे परडां यासि चत्रोजी व साबाजी व वासदेवजी व शेक-राजी देशमुख मामले परडां व सुभानजी मोकदम मुजेरी व समस्त दाहीजन कीा मजकूर सुा सन ११२४ कारण दानपत्र लिहून दिल्ह ऐस जे बाबद सेत मळा साकरविहीर मिरास खड माली व बहीर माली व सोनका माली विन नवल माळी साडेकर थळ चावर पाऊन .।।। बाा जिराती यासि सेजार पुर्वेश शकराजी देशमुख व

दक्षेनेस सिदी मसुद शकराजी देशमुख व पछमेस सेत चुनेदान बा तुक माली कापशहा उतरस सोनमळा शकराजी दो व कावळा येणे प्रमाणे हद महदुद असे हे तुह्मास बदल अधिस्टान डोबगाउ हवेली मांार श्री चे नैवद्यास दिल्ह आसे हे आपण तुमच उतरोतर चालउ हे दानपत्र लिहून दिल सही (नांगराची निशाणी)
तेरीख १२ माहे रबिलाखर

गोही

बेनाजी साा
ब्रह्म माली वलद लख माली
अपाजी माली मेहतर कीाा मा
(धंद्याची निशाणी)
भिमाजी नागेश कुळकर्णी कसबे परडा
बीा बाळाजी माधव कुलकर्णी कीाा मांार

तुळाजी नाईक वाड पाा हवेली परंडा
दादजी आहीर कसबे मजकूर
सत माली वलद धाज माली घाटालकर
गोपाळ नरसीह कुलकरणी कीाा मा

दसखत देशमुखानी मामले परडा

(नांगराची निशाणी) { चतरोजी, वासदेव गगाजी

साबाजी विठल
शकराजी

१६३७ च्या चैत्र शु. १५ स ह्मणजे कल्याणस्वामींच्या निधनापूर्वी अवघे तीन च महिने हें दानपत्र झालेलें आहे. त्या वेळीं स्वामी परंड्यास होते. स्वामी चार महिने परंड्यास, चार महिने डोंबगांवीं व चार महिने डोणज्यास राहत व परंडे येथें त्यांचें देहावसान होऊन परंड्याच्या देशमुखांनीं तेथून वाजत गाजत त्यांना डोबगांवीं नेलें, अशी जी दंतकथा आहे, ती खरी दिसते. त्या भाग्यवान देखमुखांचीं नांवें या पत्रांत आलीं आहेत. त्यांच्या वंशजांकडे शोध केला पाहिजे.

वरील टीप दिली गेली, परंतु दानपत्र प्रत्यक्ष श्री कल्याणस्वामींच्या नांवानें करून दिलेलें असल्यामुळें १६३६ च्या च आषाढांत ह्मणजे या दानपत्राच्या मित्तीच्या पूर्वीं च कल्याणस्वामी समाधीस्थ झाले होते असा समज आहे, इकडे लक्ष गेलें नाहीं. कल्याणस्वामींच्या निधनशकाविषयीं या दानपत्रानें मोठा संशय उत्पन्न होतो. १६३६ च्या आषाढांत ते समाधीस्थ झाले, असा तर समज आहे व १६३७ च्या चैत्रांतील या दानपत्रांत " कलियान बावा हली वस्ती कसबे परंडा " असें स्पष्ट आहे ! या गोष्टींची केव्हां तरी एकवाक्यता केली पाहिजे किंवा समज चुकीचा ठरून निराळा शोध लागला पाहिजे.

---

**लेखांक ४३१ ]** **१६३७ श्रावण शु. ५** **[ अस्सल-मोडी**

हा व पुढचा असे दोन लेखांक मागील लेखांक ४२१ व ४२२ या दोन लेखांकांबरोबर वाचावे. बाह्याच्या वतनाचे हे चारी कागद डोमगांवीं कां मिळावेत याचा या लेखांकावरून उलगडा होतो. नारो मुरारी यांस त्यांचे वडील मुरारी नारायण यांनीं श्रीकल्याणस्वामींच्या चरणावर वाहिले होते व ते बरा च काळ डोंबगांवीं राहून पुढें बाह्यास येऊन राहिले. बाह्यास कुळकर्ण्यांचे कडे डोंबगांवमठाचे कांहीं कागद निःसंशय सांपडावेत. हे लेखांक फार च अशुद्ध लिहिलेले आहेत.

सतोशपत्र शके १६३७ मनमथनाम सवंत्सरे स्रावण सुध पचमी रविवार तदीन लेहून दिले सतोशपत्र राजश्री नारो मुरारी कुलकुर्णी मौजे बाहे पा। वालवे यानी लेहून दिले सतोशपत्र नरसो माहादेव व दासोराम अपल गोत्रज भाउ अहेती अपल वडिलानी मौजे मजकूरचे विर्ती कुलकर्ण माधेजनापासी खरीदी केल भोगवटा च्यारी पुरश चालत अले साप्रती अपली भावजये जिवाई व चिरजीव माहारुद्र व मुरारी नरसीहे अपल पुतण ही विर्ती चालवीत असता इस्वरे या त्रिवर्गास ही देवज्ञा जाहाली ते समई जिवाई अमची भावजयेन

चिरंजीव नरसो माहादेव अपला पुत्र ह्मणून समस्त ग्रामस्त मेलऊन साखर वाटून पुत्र घेतला त्रिवर्गाची उतरक्रिया नरसो माहादेव यानी केली अणी गावावरी कुलकर्णपणाचे सेवा चाकरी करून राहिले अणि अमचे शोध करावयास डोंब्रगावास अले अपणास अपले पित राजश्री मुरारी नारायेण पितयानी श्री सनिध स्वामीस वाइल अपण श्री सनिध राहून सेवा करीत असता अपले शोध करावयास नरसो माहादेव व दासोराम उभयेता अल की तुह्मी वडिल आहा वडिलाच विर्ती आहे वडिल विर्तीवरी नादाव हा च लाभ अहे ह्मणून कितेक प्रकार सागितलवरी अपण बोलिलो जे अपणास श्री स वाइल अता अपणास विर्तीचे चाड नाही ऐसे बोलिलोवरी अपल गुरु माहाराज राजश्री स तुह्मी विनती केलियावरून स्वामीनी मनास आणून अपणास अज्ञा केली की विर्तीवत आहा तुमचा भाउबद नरसो माहादेव व दासोराम न्हावयास आल याजबराबरी जाण व्रीर्तीवरी नादावे लग्न करून घेण ह्मणून स्वामीनी अज्ञा केली स्वामीच अज्ञवरून गावास अलो गावीच हलहवाल मनास अणिला अणि अपल विचार अपल ठाई मनास अणिता अपण येक न देसी पाटी पोटी येक न देसीहून तुह्मी भाऊ तुह्मा अह्मास सुटका नाही याहीमधे वडिल भावजये जिवाईन पुत्र नरसो माहादेव घेतला मग अपण अपल अत्मसंताशं श्री साक्ष करून दोघा ग्रहस्ताच गुजारतीन निमे कुलकर्ण हकदक इनाम वा नवाल देखील विर्तीवरी उपज होईल ते दो ठाई निम नरसो माहादेव व दासोराम यानी ध्याव जराबजारा घेव अणी अपल लग्न उभयता नरसो माहदेव व दासोराम यानी कराव अणि माहारुद नरसी व मुरारी नरसी अमच पुतण यानी कर्ज वाम देण कोणाच असली ते नरसो माहादेव व दासोराम यानी द्याव अपणास कर्जास समंध नाही येस तह करून अपल भाउ अपण पदरी घेतल नरसो माहादेव व दासो-राम यानी तह प्रमाण अपल चालवावे अपण काया वाचा श्री तिरी बैसोन तुह्मास हे सतोशपत्र लेहून दिल अपल वंशपरपरा तुह्मा उभ-

येतास वंशपरपरा लेकराचे लेकरी भाऊबदपण चालावे तुह्मा उभय-ताचे वंशपरपरा लेकराचे लेकरी निम भोगवटा करून खावा निमे अमचे वंशेन खाऊन सुख असावे वडिलपण मानपान तश्रीफ अमचे धाकट भाऊ तुह्मी उभयेता अमच असा विर्तीवरी उपन होईल ते दो ठाई दोघानी खावे विर्तीवरी कसाला पडले तो उभयतां तुह्मी व अह्मी वारावा श्री[1] रघूनाथ व कृष्णा साक्ष आसे हे लेहुनी दील्हें सही दस्तुर दस्तुर

गोही

बहिरोराम मौजे उरुण
यादो रुद्र कुलकर्णी मौजे खेलजी पाटील
कलमेरी ता। मा।र नागोजी दामोधर व
नरसो हरी कुलकर्णी
मौजे मजकूर

---

लेखांक ४३२ ] १६३७ श्रावण शुद्ध ५ [ अस्सल-मोडी

श्रीरामप्रसन

तीर्थरूप राजमान्ये व देवमान्ये राजश्री नारो मुरार
कुलकर्णी मौजे बाहे स्वामीचे सेवेसी

विनती सेवक नरसो माहादेव व दासोराम कुलकर्णी मौजे मा।र दोनी कर जोडून सा। नमस्कार विनंती उपरी स्वस्ती श्री शके १६३७ मन-

१ येथून मजकूर बाळबोध असून स्वदस्तूरचा दिसतो.

मध नाम सवछर स्रावण सुध पचमी रविवार तदिनी स्वामीनी आह्मास संतोशपत्र लेहून दिल्हे आह्मी उभयेता स्वामीचे पदरीचे स्वामीचे वडिल रा। नारो माहादेव यांनी मौजे मा।रचे कुलकर्णी खा। करून विर्तीवरी नादत असता साप्रत ईस्वरे स्वामीचे बधु नरसो मुरार याचे पुत्र माहारुद्र व मुरारी होते यांची माता जिवाई होती ते त्रिवर्ग हि देवाज्ञा जाहाली विर्तीवरी कोन्ही नाही मग आह्मी डोबगावास जाऊन माहाराजस्वामीस विनंती करून गावास आणिलेवरी गावीचा विचार आचार स्वामीनी आपले द्रिस्टीने पाहिलेत्तरी स्वामीचे आजे राजेश्री नारो माहादेव आमचे आजे व रा। नरसो माहादेव दोघे साक्षात बधु हा हि विचार स्वामीनी मनात आणिला व आपण येक नफसी पोटी लेकरु नाही पाठीसी बधु कोन्ही नाहीत ऐसा विचार पाहून आह्मा उभयेतास पदरी घेतले आपण स्वामीचे पदरी पडलो मौजे मा।र कुलकर्णीविर्ती निमे स्वामीनी भक्षावे निमे आह्मी उभयेतानी भक्षावी इनाम इजारती पटी पछोडी दाईजमा व नोक जराबजरा उतपन होईल ते व्रितीवरी दो ठाई स्वामीनी निमे व आह्मी उभयेतानी निमे स्वामी दिल्हे प्रमाणे वौंशपरंपरा स्वामीचे लेकराचे लेकरी व आह्मा उभयेताचे लेकराचे लेकरी भक्षुन मायेलेकरापणे गावात्तरी नादावे स्वामीचे लग्न आह्मी उभयेतानी मिलोन करून द्यावे स्वामीचे सेवा चाकरी आह्मी करावी स्वामी आह्मास वडिल आमचे चालवावे स्वामी वडिल स्वामीचे पानमान वडिलकी तश्रीफ स्वामीनी घ्यावे स्वामीनी आमचे आपले धाकटे भावाप्रमाणे चालवावे हे लेहून दिल्हे पत्र सत्य यासी आनेथा होणार नाही बहुत काये लिहीणे हे विनंती

गोही

| | |
|---|---|
| बहिरोराम | खेलजी बीन पाटोजी पा। व |
| यादो माहारुद्र कुलकर्णी मौजे | नागोजी दामोधर व नरसो हरी |

कळमेरी ता। मा।र व जाधो नरहरी कुलकर्णी मौजे उरुण पा। वाळवे व खानजी खा।

---

लेखांक ४३३ ] १६३८ श्रावण व. १ [ अस्सल-मोडी

J

कल्याणस्वामी

फारसी शिक्का

जुबदतुल येकरान चत्रोजी व साबाजी व वासदेवजी व सकराजी देसमुख मा। परडा सु।। सन हजार ११२६ बिदानदकी माहाराज राजश्री श्वामि यासी मौजे गोडरेथे इनाम चावर १ येक जीराईती व बागाईत बीघे ८३५ पसतीस येक चावर तीस बीघे दीले आहेत तरी तुह्मी श्वामिच्या वउशपरंपरा चालवणे येकजरा उजुर न कर्णे जाणीजे छ १५ साबान मोर्तब सुद ( शिक्का )

बारसुद

[ शेवटचा " मोर्तब सुद " चा शिक्का अर्धचंद्राकृति असून मध्यभागीं वर त्रिकोणाकृति आहे. " ८३५ पसतीस" "तीस" हीं अक्षरें खोडून लिहिलेलीं दिसतात. मागील लेखांक ४३० यांत या देशमुखांचीं नांवें आलेलीं आहेत. " साबान मोर्तब सुद " हीं अक्षरें निराळ्या हातचीं आहेत.

---

लेखांक ४३४ ] १६४० वैशाख वद्य ९ [ अस्सल-मोडी

| श्री सांप्रदायिक कागदपत्रांत बाळाजी विश्वानाथांचा संबंध असलेलें
| हें पहिलें च पत्र होय.

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषक शके ४४ विलंबी सवत्सरे वैशाख बहुल नवमी इदुवासरे क्षेत्रीय कुलावतस श्री राजा शाहुछत्रपति स्वामी याणी मोक-

० श्री
राजा शाहु छ
त्रपति हर्ष नीधा
न बाळाजी वि
श्वनाथ प्रधा
न

० श्री
श्री आई आदि पुरु
ष श्रीराजा शाहु छत्रप
ति स्वामि कृपानिधि त
स्य श्रीनिवास परश
राम प्रतिनिधि

दमानी मौजे देवगाव ता। हावेली प्रा। सातारा यांसि आज्ञा केली ऐसी जे रा। मुधावा गोसावी रामदासी यांनी मठ मौजे मजकुरी केला अहे त्यासि तेथें अनछत्र चालिले पाहिजे याजनिमित्य स्वामी त्याजवरी कृपाळु होऊन मौजे मजकूर पैकी पडजमीन अवल दुम सीम ती प्रतीची बिघे ८११ अकरा कुलबाब कुलकानु खेरीज हकदार यासि व याच्या सिशशाकेस इनाम दिल्हे असे तरी प्रस्तुत मठी बयाबाई राहत आहेत तरी तुह्मी सदरहु जमीन याच्या मोजून दुमाला करणें अणि इनाम चालवणें प्रतिवर्शी नवीन पत्राचा अक्षेप न करणें या पत्राची प्रति लेहून घेऊन मुख्य पत्र भोगवटीयासि याजपासी परतून देणें लेखनालंकार[1]

मर्या
देयं रा
जते

रुजू सा।
मंत्री

तेरीख २२
जमादिलाखर सुा। समान

1 निराळें अक्षर.

बार सुद सुरु सुद

बार बार

मुधावा गोसावी ह्मणजे कल्याणांच्या पश्चात् डोमगांवीं मठपति झालेले मुद्गलस्वामी होत. त्यांनीं सातारा जिल्ह्यांत देवगांवीं मठ स्थापन केला होता, असें दिसतें. त्या मठाचा शोध करणें आवश्यक होय.

---

लेखांक ४३५ ] १६४३ भाद्रपद वद्य ११ [नक्कल-मोडी

डोमगांवमठाला मिळालेली ही एक सनद होय.

ि

कल्याणबावा असल बमोजिब नकल

मुासदीयांन मर्दमा तबल व इस्तकबाल व देशमुखाण व देशपाडे याणी व मोकदमानी व रायान पाा हवेली परंडा सरकार मजकूर सुबे खुजस्ते बुनियाद सुाा सन ११३१ बिदानदं कीं माहराज राजेश्री गोसावी यांची समाध मौजे डोमगांवी आहे त्याचें पुन्येतिथींस व पूजेच्या वगैर खर्चा बदल दरवजे धर्मादाउ प्राा मजकूर पैकी मौजे रोंसे दरोबस्त कुलबाब्र कुलकानु जो आकार होईल तो माा करून दिल्हे असे तर मौजे मजकूरचा महसूल साल ब साल जो होईल तो बिला कसूर गोसांवीबावाच्या मठास पोहचावीत जाणे की त्याचे पुन्येतिथींस व पूजेस खर्च करून आसीरवाद देते त कीजे दरसाल सनद मुजद्दा तलब न करण नकल घेऊन असल फिराऊन देणे तेरिख २४ जिलकाद मोर्तब सुध

रुजु दफ्तर दिवाणी

२४ जिल्काद

**लेखांक ४३६ ]** १६४४ **[ अस्सल-मोडी**

| कल्याणस्वामींच्या मठाला मिळालेलें हें एक खाजगी उत्पन्न होय.

श्रीरामसमर्थ

श्रीसद्गुरु रामीरामदासस्वामी श्रीकल्यानस्वामी श्रीमुदगल-
स्वामी याचे सेवसी

आज्ञाधारक निराई मो मौजे सेलगाउ प्रा हवेली मामले परंडा सन **११३२** करद्वये जोडून श्री चरणास सा। प्रनिपांत विनवावया प्रार्थना ऐसी जे आपणास देशमुखी इनाम चावर येक दिल्हा त्या पैकी हुल-गंडवाडीपासि चावर निमे -॥- आहे त्या पैकी चावर ·।· पाव स्वामींच्या नवेद्यास आर्पण केला असे यासि पुढें उतोरोतर स्वामीची परंपरा व आपली वौशपरंपरा चालऊन आपल्या वौशात कोन्ही विकल्प करील तर त्यासि आपल्या श्री कुलस्वामीची व आपल्या पूर्वजाची आण असे लिहिले सही

गोही

दसखत शकराजी
देसमुख मामले परेडा
शंकराजी मुदगल कुलकर्ण
मौजे अबड
गोदजी चिचवले मौजे मा॥र
भिकाजी नागनाथ गु॥ पा॥
मा॥र मजकूर
मकाजी कोढाले

निशानी नागर
( नांगराची निशाणी )
नागोजी कुलकर्णी मा॥ मा॥र
गोपाळ खडेराउ कुलकर्नी
सातापा सुतार मौजे मा॥र
सोम माळी
सीवजी तेली मेहतरे
कान्होजी व रखमाजी
चाभार मौजे मा॥र
दाउजी परीट
लखमा माहार

———

**लेखांक ४३७ ]** **१६४५ ज्येष्ठ शुद्ध १०** **[ अस्सल-मोडी**

कल्याणशिष्य तडवळेमठपति जगन्नाथ महाराज यांस मौजे गुलवरी गांव इनाम आहे, तरी तो उपभोगण्याचे कामीं महाराजांस कोणत्या हि प्रकारचा उपसर्ग लागूं नये ह्मणून अक्कलकोटचे फत्तेसिंग भोसले यांचें हे ताकीदपत्र होय.

श्रीशंकर

श्रीरामदासस्वामी

राजश्री मलार नारायेण सुबेदार वर्तमान व भावी
व कारकून गोसावीयांसि

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य श्री फतेसींग भोसले राम राम सु॥ अर्बा असरीन मया अलफ हरीभक्तिपरायेण राजश्री जगंनाथ गोसावी सांप्रदाये श्री यास मौजे गुलवरी पा॥ मा॥र हा गाव कुलबाब कुलकानु इनाम आहे त्यास तुह्माकडून रोखेपत्र होऊन उपसर्ग लागतो ह्मणून कलले त्यावरून हे ताकीदपत्र सादर केले आहे तरी तो गाव इनाम आहे तो अंजी च वजा देऊन उरले गावीची जमाबंदी करीत जाणे आणि त्या गावास येकजरा उपसर्ग न देणे दखलगिरी च न करणे फिरोन बोभाट येऊ न देणे जाणिजे छ ९ रमजान निदेश समक्ष

श्री
श्रीमच्छत्रपतेः
शाहोश्चरणासक्त
चेतसः फत्तेसिंह
स्य मुद्रेयं कौमुदी
व विराजते

लेख
नावधि
मुद्रा

सुरु सुद

पो॥ छ २२
रमजान

"निदेश समक्ष" हीं अक्षरें निराळ्या हातचीं आहेत व मथळ्यावरील "श्रीरामदासस्वामी" हीं अक्षरें आणखी निराळ्या हातचीं आहेत.

---

**लेखांक ४३८ ] १६४७ [ अस्सल-मोडी**

पाटीलकी वतनाचे शेतासंबंधीं रायाजी मेंढरा व सूर्याजी या दोन इसमांमधील व्यवहाराच्या निवाड्याबद्दलचा हा महजर आहे. रायाजी मेंढरा याचा बाप भुतोजी यास गांवकऱ्यांनीं मोकदमी देऊन शेत त्यास दिल्याकारणानें शेताची वहिवाट फार दिवसांपासून त्याचेकडे चालू होती. पूर्वीं एके वेळीं या शेताबद्दल व्यवहार होऊन त्या व्यवहाराचे निर्णयामध्यें शेत रायाजीचा बाप भुतोजी याचें ठरलें होतें व त्याबद्दल एक महजर झालेला होता. तो महजर व गांववतनदारांचा पुरावा लक्षांत घेऊन शेत रायाजीच्या मालकीचें ठरविण्यांत आलें. असा या महजरांतील व्यवहाराचा थोडक्यांत सारांश आहे. कागद अत्यन्त जीर्ण झाला असून आरंभीचा एका बाजूचा अर्धा भाग फाटण्यांत गेलेला आहे. मधून मधून हि ठिकठिकाणीं कागद फाटला आहे.

+ +

+ + + + + + + भुतोजी मो + + + + + + + + + मामले परडा + + + + + + + + मा करून दि + ऐसाजे + + + + + पाटील + + + उजी पा मो चौबला + + + होते त्यावरी यानी मजकुरावरी सुर्याजी + + + करून जोरा(व)-रीणे सेते हिरोन घेतले या + + नफर मजकूर + गैर हजीर होऊनु बाहेर गेला होता त्यावरी अमारत व अयालत पन्हा नवाब साहेबास किला अर्जानी + + ला त्यास रायाजी मजकुरे आपले अर्जदास मुदेवार साहेबी + + + स पाठविले तेथे हकीकती र्लेहिले की आपली व याची मुनसफी हकीमखा काजी आली साहेबी केली +

महजर त्यांचे मोहरेसी व गावीचे गौहीसी आपना घरी तो आणीयला हा हाजीर जाला नाही ते गोत घरीची लेहीले ही आणून दिधली यैसे असोन अपनावरी ताजजी करून +तीमात+ हे पिकली पिके सेत घेतले आपन बेजोरसर तो मालदार आहे तरी साहेब गरीब परवरी करून आपली मुनसफी हक केला पाहिजे आणी आपनास कौळ सादर जाला बदगीस येउन ह्मणउनु अर्जदस केला त्यावरी साहेबी कौल मरामती केला तो सीरी धरून नफर मजकूर हजूर हजीर जाला त्यावरी साहेबी इनसाफ खातीरे आणितां सूयाजी व रायाजी हर दो जण गावीचे गौही त्यास राजी जाले आणि राजीनामे लेहोन दिधले त्यास गावीचे गोही बोलाऊन पुसीले तेही आपले इमान सुमरून तकरीरी केलीया नफर ७ बीता॥

कीता १ ता॥ बो॥ माउजी मेढाऱ्या मौजे मा॥ तकरीर केली जे रायाजी मधे व सूर्याजी मधे सेताचे भाडीन आहे त्या सेताची मिरासी काकडा करीत होता तो दुकला मधे बुडाला त्यावरी मोकदमी दाहीजण मिळोन भुतोजीस लावणी करून दिधले त्या दिवसा पासून भुतोजी करीत आला आहे हली सुर्याजीणे सेत हिरोन घेतले हे तकरीर सही

कीता १ ता॥ बो॥ नरसोजी मिसकीन रयेती तकरीर केली जे रायाजी व सूयाजी सेताबदल भाडिताती आहेत त्या सेताची मिरासी काकडा करीत होता तो दुकला मधे बुडाला सेत मोकदमी व दाही जणी मिरासी करून लावणी रायाजीस करून दिधली ते ई पासून करितो हली सूर्याजीने हिरोन घेतले हे तकरीर सही

कीता १ ता॥ बो॥ तीमाजी बिराजर गोपाल मो॥ मौजे मा॥र तकरीर केली यैसीजे सेत काकडाचे भुतोजी करितो कैसे करितो हे

कीता १ ता॥ बो॥ + + + + मौजे मा॥ ता॥ केली जे सेत काकडाचे मेढारा याने करितो मीरासी करून दिल्ही आहे आप-

अपनास ठावके नाही आपन काही कारभारी नाही तकरीर सही

कीता १ ता। बो। रतन नाक माहार मौजे मा।र ता। केली जे काकडाचे सेत मिरासी मेढारा गाने करितो त्यास मीरासी करून दिधली हे आपनास ठाउक नाही हे ता। सही

कीता येक ता। बो। सताजी गुरव हली वस्ती मौजे मा।र ता। केली यैसेजे आपन गैर मीरासी सेताची हकीकती ठावकी नाही हे तक-रीर सही

नास ठाउके नाही हली सूर्याजीणे घेतले आहे तकरीर सही

कीता १ बो। येसाजी मिसकीन ता। केली जे सेत काकडा चे रायाजी करितो त्यास मिरासी करून दीधली हे आपनास ठावके नाही ता। सही

की।————

०

ऐसी गावकरी गोही दिधली आणी पाहिले महजर सन १०८५ मधे निवाडा बमुजीब + + + + + हर हजरती काजी अली साहेबु हकीमखा आहे

महजरनामा बो। भुतोजी रया साकीन मौजे डोबगाउ पा। हवेली मामले परंडे सु॥ सन १०८५ कारणे महजरनामा लेहोन दिधला ऐसा जे बहीरजी पाटील चौबला सेताबदल करकसा करित होता की पाव चावर सेत आपले मिरासीचे आपना बाबत आहे ह्मणौन तुवा अमारत व अयालत पन्हा नवाब सैद महमद खान साहेब्र यापासी उभा राहिलास जे अजी पनास वरसे आपन सेत करितो आणि आता बहीरजी मज + + + + करकसा करितो तरी साहेबी इनसाफ केला पाहिजे ह्मणोउन तुझे गोहीदार हजूर बोलाउनु त्यासी पुसिले की हरहक गोही देणे बयाजी मोकदम वगैरे गोहीदार यानी गोही दीधली की सुर्याजी आपला बाप होता त्याणी यास + + + + पाढरीचे

वेलेस मिरासी करून सेत दिधले आहे अजी पनास वरसे सेत आह्मा देखता करितो बहीरजी कई नीयासी भाडत आहे बल टका आहे ह्मणउनु गोही गुजरली मग सदरहूची गोहीदार नजीक हकीम शरायेत पन्हा आणिले व हजरती कार्जा भले साहेबु गोहीदारावरी इमान घातले की हरहक गोही देणे त्यावरी गोहीदारी गोही + ली जे सेत भुतोजीचे खरे असे आजी पनास वरसे + + + जूर करितो सूर्याजी व बहीरजीची मिरासी नाही ऐसी गोहीदारी गोही दीधली बी॥

| | | |
|---|---|---|
| बापोजी मो मा मार | नरसोजी मीसकीन | माउजी मेढा |
| १ | १ | १ |
| कालसेटी सेटिया | राजजी चौबला | बावाजी घोरपडा |
| १ | १ | १ |
| आबाजी मिसकीन | नारावा व गोपाल कुलकर्णी | निबनाक माहार |
| १ | १ | १ |
| केरनाक माहार | शकरा माहार | की॥ |
| १ | १ | |

सदरहुजणी गोहीदारानी गोही दीधली जे सेत भुतोजीचे खरे आहे बहीरजी कई भाडित आहे बलटका आहे ऐसी गोही करून मालुम जाले की सेत भुतोजीचे खरे आहे लेकराचे लेकरी वाहोन खाने पेस्तर बहीरजी हिला हरकत करील तरी शराचा गुन्हेगार व गोताचा खोट होईल हा महजर सही

ऐसी सनद गोही मनास आणिता रायाजी वा भुतोजी मेढा याचे सेत खरे आजी पनास वरसे करितो सूर्याजी मो ताजजिणे यासी करकसा करितो तो झुट आहे त्यास पोहचत नाही हली सेत पाव चावर व त्या सेताचे निसबतीचा वाडा ऐसा रायाजी बीन भुतोजी

मेढा यासी याचे दुमाले केला आसे दुधा सुखे क + + + आबा-दानी करून लेकराचे लेकरी खाने + + + स्टीचा दगदगा न धरणे सेत व वाडा तुझा खरा सूर्याजी मो लटका + + हिला हरकती करील तरी सेराचा गुन्हेगार व दिवाणीचा + + + + + +

या महजरांतील एका महत्त्वाच्या मुद्याचें जरा विस्तृत विवेचन करणें जरूर आहे. महाराष्ट्रांतील ग्रामसंस्थेसंबंधीं एक विशेष हा आहे कीं, ग्रामसमाजांतील व्यक्तींच्या जीवनव्यवसायास आवश्यक अशीं कार्यें करण्याकरतां वतनदार लोकांची योजना करण्यांत येत असे. मुकदम अथवा पाटील, कुळकर्णी व जोशी, महार, मांग, सुतार, न्हावी, गुरव, धोबी, कुंभार, चांभार, इत्यादि वतनदार महाराष्ट्रांतील प्रत्येक ग्रामांत आढळण्यांत येतात. हे वतनदार ग्रामसमाजांतील ठराविक कामें वंशपरंपरा करीत व त्याबद्दल वेतन ह्मणून त्यांस ग्रामसमाजांतील व्यक्तींकडून रोख पैसे न मिळतां कांहीं ठराविक हक्क मिळत. ही व्यवस्था कोणीं व कधीं अस्तित्वांत आणली याबद्दल प्रत्यक्ष लेखी पुरावा अद्यापपावेतों उपलब्ध झालेला नाहीं. स्मृत्यादि ग्रंथांतून वतन अथवा वृत्ति यांच्या उत्पत्तीबद्दल सविस्तर विवेचन केलेलें कोठें आढळत नाहीं. प्रत्यक्ष पुराव्याचे अभावीं यासंबंधीं इतर बाबींवरून अनुमान काढण्यावांचून गत्यंतर नाहीं. इतिहास आणि ऐतिहासिक मासिक पुस्तकांत इतिहाससंशोधक विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांची महाराष्ट्राच्या वसाहत-कालासंबंधीं जी लेखमाला प्रसिद्ध होत आहे, त्या लेखमालेचीं पृष्ठें १८४ व १८५ मध्यें ग्रामांतील वतनदार अगर वृत्तिवंत यांच्या उत्पत्तीसंबंधानें राजवाडे यांनीं जो सिद्धांत नमूद केला आहे, त्या सिद्धांताची सत्यता स्थापन करण्यास या महजरांतील एका मुद्याचा चांगला उपयोग होणार आहे. रा. राजवाडे यांचा सिद्धांत असा आहे कीं, " वृत्तिवंत हे कांहीं राजनिर्मित नव्हते. ह्या च कारणा करितां कुळकरणी, वगैरे वृत्तिवंतांना राजपत्रें ऊर्फ सनदा नाहींत. कारण, ते राजनिर्मित नाहींत, लोकनिर्मित आहेत. * * * * * गावांतील सर्व वृत्तिवंत गावांतील सर्व वृत्तिवंत निवडीत आणि त्यांत च ग्रामणीची ह्मणजे ग्रामकूटाची ह्मणजे गांवढ्याची ह्मणजे पाटलाची निवडणूक करीत." रा. राजवाडे यांचा वृत्ति-वंतांचे उत्पत्तीसंबंधीं वरील सिद्धांत बरोबर आहे, असें या मह-

जरावरून शाबीत होत आहे. ज्या शेतासंबंधीं रायाजी व सूर्याजी यांच्या मध्यें व्यवहार होता, तें शेत मोकदम अथवा पाटील वतनदाराचे मिराशी होतें व तें शेत मूळ वतनदार काकडा हा बेवारशी मयत झाल्याकारणानें रायाजीचा बाप भुतोजी मेंढरा यास गांवचे लोकांनीं दिलें.

महजरांत यासंबंधीं उल्लेख असा आहे:—

" त्या सेताची मिरासी काकडा करीत होता तो दुकलामधें बुडाला त्यावरी मोकदमी दाही जण मिलोन भुतोजीस लावणी करून दिधले त्या दिवसापासून भुतोजी करीत आला. आहे ***"

गांवचा मुकदम काकडा बेवारीस मयत झाला सबब गांवची मुकदमी गांवांतील दाही जणांनीं भुतोजीस देऊन मुकदमाचे मिरासी शेत त्यास दिलें, असें या महजरांत स्पष्ट म्हटलें आहे. हा महजर जेव्हां झाला तेव्हां मामले परंडा ( ज्यामध्यें व्यवहाराचें शेत होतें ) हा मुसलमानी अमला खालीं होता, असें असून गांववतनदार बेवारस मेल्याकारणानें नवीन मुकदमाची नेमणूक तत्कालीन राजानें अगर त्याचे अधिकाऱ्यानें न करतां मुकदमाची नेमणूक लोकांनीं केली व ती नेमणूक तत्कालीन राजानें मान्य केली, हें वरील उल्लेखावरून उघड होत आहे. वृत्तिवंत अगर वतनदार निर्माण करण्याचा हक्क ग्रामसमाजांतील लोकांचा असून, त्या बाबतींत हात घालण्याचा राजास हि अधिकार नसे, ही बाब वरील उल्लेखावरून स्पष्ट होत आहे.

---

**लेखांक ४३९ ] १६५६ पूर्वं [ अस्सल-बाळबोध**

उंबरजमठपति केशवस्वामी यांचें हें बहुधा सकवारबाईना पत्र दिसतें.

श्रीमत्कल्याण

धर्मस्थापनेचे नर : ते वीष्णुचे आवतार : कीर्ती वाढे निरंतर वीस्वतोमुखी ॥ १ ॥ सकळ सौभाग्याचें भूशण । उमा रमा सावीत्री संपुर्ण । तें चि सौभाग्य संपुर्ण । देखों तुमचे ठाई ॥ २ ॥ यांवीराजीत सौभाग्यवती वज्रचुडेमंडीत मातोश्री बाई सर्वमान्य यांप्रती स्नेहपुर्वक केशवनाम्नेन असिर्वाद उपेरी तुह्मी श्रीदर्शनास गेला बहुत उत्तम जाले यानंतर आमच्या स्वामींनी श्रीसेवेसी आपला जंन्म घातला ऐलीकडे

आह्मी हीं तीस वर्शे शक्तीनसार सेवा केली ऐसियास राजेश्री गंगाधर-बावा आह्मासी व आनंत गो यासी स्पर्धा करुन श्रीसेवेसी अंतर पाडी-ताती तरि आपण कृपाळु होउन त्याचा आमचा न्याये मनास आणुन ज्याचा आन्याये आसेल त्यास सिक्षा केली पाहीजे वीशेष बया वीनंती करिल त्यावरुन श्रुत होईल हा असिर्वाद ॥ ७

( १ ) श्रीदर्शनास ह्मणजे श्रीसमर्थदर्शनास सकवारबाई सज्जनगडीं गेल्या होत्या. ( २ ) आपले स्वामी ह्मणजे कल्याणस्वामी यांनीं आपला सारा जन्म श्रीसमर्थसेवेकडे खर्च केला व ( ३ ) आपण हि आपल्या आयुष्याचीं गेलीं तीस वर्षे श्रीसमर्थांची सेवा केली असें केशवस्वामी ह्मणतात; परंतु ( ४ ) अलिकडे श्रीसमर्थांचे नातु गंगाधरस्वामी आपणांस व अनंत गोसावी यांस सेवा करूं देत नाहींत, अशी तक्रार करितात.

---

**लेखांक ४४० ]** १६५६ पूर्व **[ अस्सल-बाळबोध**

कल्याणांच्या पश्चात् डोमगांवमठाचें आधिपत्य मुद्गलांकडे आलें. कल्याणांचे बंधु दत्तात्रय हे शिरगांवीं असत. त्यांचें किंवा त्यांच्या पश्चात् शिरगांवमठपति झालेले राघव यांचें हें मुद्गलांना पत्र दिसतें.

श्रीरामवरदमूर्ति कर्ता ॥

समर्थ कल्याण

मोक्षश्रीया विराजीत राजेश्री मुद्गलगोसावियांप्रति सुचना ऐसी जे हें वर्म तुह्मी च आह्मास करून ठेविलें आणी तुह्मी च नस्त कजीये आरंभीलें याचा वीचार बरा पाहाणें परबुधीनें न वर्तणें येथें सातारां तुह्मीं शफत करून घेतलि किं तुह्मी आपलीया वडीलांचें स्थळ सांभा-ळा आह्मी तीकडील चर्चा करूं तरी आह्मास श्री स्वामीची आण ऐसें बोलीलेती आणी आतां राजेश्रीपासी आनृतवादाचे आर्ज करून रा। गंगाधरबावानि व रा। कचेश्वरबावानि कजीया नीवडीलां ऐसें बोलतां तरी रा। गंगाधरबावानी व कचेश्वरबावानि कल्याणस्वा-मीच्या उत्छवास गाव यक दिला यक श्रीकडे ठेवीला परंतु तुमची

आमची बोलीचा कजीया तुटला नाही आणी तुह्मी मधें च आडोन पत्रें करवितां तरी हे गोष्टी कामा येत नाहीं रा गंगाधरबावा सांगतिल त्याप्रमाणें तुह्मी वर्ता आह्मी वर्तो हें वर्म सांडोन चोरून पत्रें करून घ्याल तरी तुह्मास श्री स्वामीची व श्री स्वामीची दोही आसे व राजा शाहुछत्रपती महाराज याची सात दोही आसें आमचा नीवाडा जाळ्या वेगळें तुह्मास पत्रें करायास गरज नाही आणी लटीकें तुह्मी सांगीतलें किं सीरगावीचे दोनी चावर जमीन देउन त्याचा तटका तोडीला आहे आणी आह्मास सगळा गाव दिला आहे ऐसें बोळतां तरी दोनी चावर जमीन कोणें कोणास दिलि आणी तुह्मास गांव कोणें दिला याचा नीवाडा करा न करा तरी तुह्मास दोही आसे हे वीनति

शिरगांवच्या जमीनीसंबंधानें मुद्गलांनीं शाहुछत्रपतीपासून कांहीं कागदपत्र करून घेण्याचा घाट घातला, त्याविरुद्ध शिरगांवमठपति तक्रार करितात की, तुह्मी छत्रपतीना अनृत गोष्टी सांगून कागदपत्र करून घ्याल तर तुम्हांस श्रीसमर्थांची, कल्याणांची व छत्रपतींची शपथ आहे, समर्थवंशज गंगाधर बावा निवाडा करतील तो उभयतांनीं मान्य करून त्याप्रमाणें वर्तावें हें उभयतांस श्रेयस्कर होय.

---

लेखांक ४४१ ] १६५६ पूर्व [ तत्कालीन-बाळबोध

कल्याणांनीं व त्यांच्या संप्रदायपुरुषांनीं सद्गुरूंच्या अधिष्ठानाची जी सेवा केली तिजबद्दल त्यांना गंगाधरस्वामींनीं शिष्यपरंपरेनें तीन अधिकार दिले, ते या पत्रांत देऊन प्रत्येक अधिकार कां दिला याचें कारण सांगितलें आहे.

श्रीरामसमर्थ

स्वस्ती श्रीमद्रामदासवौश पौत्र गंगाधरनाम्ने प्रीतीपुर्वक समस्त गुरुभक्त रामउपासक यांस आशीर्वाद उपरी यानंतर सुचना येसी जे मोक्षश्री· कल्याणगोसावीं लेखक श्रीसन्नीध सर्व प्रकारें येही सेवाश्रम केले त्याउपरी त्यांच्या समुदायपुरुशानी ईमारती व यात्रा मोहछ्यावीशीं बहुत श्रम केले त्यावरुन श्रीची सेवा दत करून दील्हें

मसुरीचे स्छळ ईनाम पुजा
नवमीचा कथारंभवीडा
रथावरुन खोबरें गुलाल टाकावा

येणें प्रमाणें शीश्यपरंपरेसी वतनी सेवा करुन दील्ही काय नी(मी)त्य ह्मणाल तरी मसुरामधें मठाच्या स्छळावरी अंब्रवृक्ष होता त्याची डाहाळी तोडावी तेव्हां स्छळ सीध पावेल याजनीमीत्य बहुतांस आज्ञा केली परंतु कार्य जालें नाही ते समर्इ यांस आज्ञा केली यांही वंदन करून मान्य केली परंतु डाहाळीसमेत पडीले ते समर्इ पुर्व अभीधानाचा त्याग करून कल्याणगोसांवी नाम ठेवीलें यास्तव ते स्छळ दील्हें ह्मणाल ते समर्इ श्रीनें दील्हें नांही तरी यांस अगत्य नव्हतें सन्नीध सेवा टाकुन स्छळीं न राहावें यानीमीत्य राहीलें पुढें शीश्यसप्रदाय महंत जाले त्यांच्या स्वाध्यान केलें व नवमीचा कथारंभवीडा काय नीमीत्य तरी श्रीच्या चीतानरुप ईमारतीचें काम केलें यावरून हें दील्हें व रथावरील सेवा काय नीमीत्य तरी श्रीच्या अवतारपुर्णतेपासुन रथोछाह राहीला तो बहुत येत्नें सीधी पाववीला त्यावरून हे तींन्ही सेवा शीश्यपरंपरेस वतनी करून दीधल्या यास कोण्हीं अन्यथा करील आणी अन्यथा मानील तो आपला श्रीसप्रदाई नव्हे हा आशीश्य

ईत्यलं

( १ ) कल्याणनामाची उपपत्ति आपण समजतो तशी च आहे, ( २ ) कल्याणांना इनामाची जरुरी नव्हती, श्रीचरणसेवा सोडून त्यांना दुसरें कांहीं नको होतें, ( ३ ) चाफळच्या मंदिराचें काम श्रीसमर्थांच्या चित्तानुरूप कल्याणांनीं करविलें व ( ४ ) श्रीसमर्थांच्या अवतारपूर्णतेपासून कांहीं काळ रथोत्सव बंद पडला होता तो कल्याणांनीं पुन्हां सुरू केला, अशा चार गोष्टी या पत्रावरून सिद्ध होत आहेत.

लेखांक ४४२ ] १६५८ चैत्र शु० ७ [ अस्सल-बाळबोध

श्रीरामसमर्थ

श्री समर्थ

माहाराज श्रीकल्याण

स्वामी यांचे सेवसी

दासानुदास सीवरामस्वामी यांचे दास दामोदर गोसावी व समस्त बंधुवर्ग या वास्तव्य मठ आपचंदें[2] समत[3] माहागांवं[4] पाा कलबुरगें चरणावर मस्तक ठेउन साष्टांग नमस्कार विज्ञाप्त ऐसी जे पुर्वी स्वामीनी सेवा समर्थाची द्रव्य पदार्थ करून करीत होते त्यानंतरें आपणापासुन कांहीं घडोन न आली यानिमीत्य समस्त वडील महंत श्रीचे त्याच्या पायांपासुन आपण स्वसंतोशें आज्ञा मान्य केली जे तपसील ११०१ अक्रा शत रुपये अक्रा वरुशांत दरसालीं शत प्रमाणें भरून श्रीपायांपासीं प्रवीष्ट करूं यांत संदेह कोण्ही करील तो श्री पायांपासीं अन्याई होईल शकें १६५८ नळनाम संवत्छरे चैत्र शुद्ध सप्तमी चंद्रवार सन्न ११४५

१ आपचंदमठपति शिवरामस्वामी हे कल्याणांचे शिष्य होत. २ आपचंद मठ मोगलाईत कलबुर्ग्यापासून पांच कोसांवर महागांव जवळ आहे. ३ समत=नजीक, जवळ. ४ महागांव येथें वडवाळ सिद्धनागेशांचा मठ आहे, मठांत ग्रन्थसंग्रह विपुल आहे. ५ शिवरामांनी. शिवराम जशी कल्याणांची सेवा करीत होते तशी आपणाकडून घडत नाहीं, असें जाणून दामोदरादि सर्व शिष्यांनी दरसाल शंभर रुपये प्रमाणें अकरा वर्षे देण्याची बोली केली.

---

लेखांक ४४३ ] १६५९ आश्विन शुद्ध १ [ अस्सल-मोडी

श्रीशाहु छत्रपति यांनीं कल्याणशिष्य मुद्गल ऊर्फ मुधार्जा गोसावी यांना ही करून दिलेली सनद होय.

श्री

रामदास

स्वस्ती श्री राज्याभिषेक शके ६४ पिंगलनाम संवत्सरे अस्वनी

शुद्ध प्रतिपदा सौम्यवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शाहु छत्रपती







स्वामी यांणीं मोकदमानी मौजे बारलोणी प्रा हवेली पराडे सरकार मार यांसी आज्ञा केली ऐसी जे मौजे मार राजश्री कल्याग गोसावी संप्रदाये श्री स्वामी याचे समाधीचे उर्जा मोहोत्सवास कुलबाब कुलकानु दो सरदेशमुखी पुर्वीपासून इनाम दिल्हा आहे त्याप्रमाणें करार असे तरी तुह्मी त्याचे शिष्य राजश्री मुधाजी गोसावी यांसी रुजु राहोन मौजे मारचा कुलबाब दो सरदेशमुखीचा वसूल सुरलीत देत जाणे ते समाधीचा उर्जा उत्छव चालवितील दरसाल ताजे सनदेचा उजूर न करणे जाणिजे लेखनालंकार




रुजु सुरु
नीवीस

| | | |
|---|---|---|
| संमत | सा। | सा। |
| सुमंत | मंत्री | सरकार |

बार सुद सुरु सुद बार बार बार बार

---

**लेखांक ४४४ ]** १६६० पूर्व **[ अस्सल-बाळबोध**

श्रीमत्कल्याण

समस्त श्री सन्नीधवासीयास केशवनाम्ने आसिर्वाद उपेरी तुह्मी सर्व श्री चे अंतरनिष्ठ भक्त आम्हि बाह्य भक्त ऐसी पत्रें लोकास लीहीतां तरि ये गोष्ठीची काये आपुर्वता कळीचा धर्म ऐसा ची आहे बरें जो वीचार करणें तो दुरि दृष्टी देउन करणें सर्व शाहाणें आहा हा असि-

१ हस्ताक्षर राजे यांचे.

बोद जेथुनिया प्रबळता: केली तेथें चि आहंता: तरि तें आवघें चि जाणार: पुढें घात चि होणार ॥ ७ ॥

श्रीमत्कल्याणसंनिधवासी मुद्गलादि शिष्यांना कल्याणशिष्य केशवस्वामी यांचें हें पत्र होय. परस्परांत कांहीं तरी वितुष्ट आलें होतें असें दिसतें. केशवांनी दिलेला शेवटचा शाप विचार करण्यासारखा आहे. केशवांनीं सांप्रदायाची कांहीं थोडी थोडकी सेवा केली नव्हती.

---

**लेखांक ४४५ ]** १६६० पूर्व **[ अस्सल–बाळबोध**

रघुनाथ गोसावी हे सातारा जिल्ह्यांतील वडगांवचे मठपति दिसतात. पत्र वाचण्यासारखे आहे.

श्रीसद्गुरुसमर्थ ॥

बाबा तात्या

उतमगुणाळंकृत श्रीस्वामीभक्तिपरायण मोक्षश्रीया विराजमान राजेश्री मुद्गल बावा व तथा राजेश्री हरी बावा बंधुवर्ग परम प्रीतिपुर्वक रघुनाथ नामने कृतानेक नमस्कार विज्ञापती एसी जे आमुचा परामृश न केला हें तों कांहि आपणासि उचीत नसे कित्येक लोकांच्या शब्दें करुनि लोकिक चि जाला परंतु हित न जालें ऐसें उभय विचारें प्रत्ययासी आलें श्री आसतां तुमची माया मजवरी होति ते काय मुखें बोलावि ऐसी नाहिं तें आठउनि झुरणी लागलों ऐसें होणार विपरित कोणाचें कांहिं चालत नाहिं बरें रुणानबंध आपलि भावना किं श्री स्वामीची नीष्टा श्री स्वामीचे ठाईं होती तैसी आमुची नीष्टा तुमचे ठाईं आहे यासी आन्यथा नसे माझें सर्वस्वें चालवायाकारणें आपणासी आधीकार आसे आणी इछा हि हे च धरीतो किं तुह्मावांचुनि बंधु आह्मा वडील कोण आहे तरी पोटातिल विक्षेप सांडूनि लोभ करणें जेणें करुनी लोकीक सांग घडे आतां त्या

श्री चि गो मुरारबावास श्री नमस्कार लिहीतार्थ परीसीजे लोभ असों दिजे

श्री चि नीळकंठ व समस्तास नमस्कार लोभ असों दिजे

प्रांतास जावयासी धजालों आसों बहुबहु लोभ आसों देणें हें कांहिं मातेसी सांगावें लागत नाहिं हे वीनंति हें चि सीवरामबावानें सा। नमस्कार कृपालोभ आसों दिजे मी तुमचें लडिवाळ आसे हे वीनंती केशव गोसांवी याच्या वचनें तुमच्या चीतांत वीक्षेप जाला आसे तरी आपण त्याचे बुधीनें वर्तत नाहिं हें खरें ॥ तुमचे आमचे भेटी नंतर जो वीचार आसेल समाधानाचा तैसें तुह्मी करा आणी आह्मी करूं यथे संशय नसे ॥

---

**लेखांक ४४६ ]** १६६० पूर्व **[ अस्सल-बाळबोध**

ही यादी बहुधा मुद्गलस्वामींची असावी. उंबरजमठपति केशव-स्वामी यांच्या विरुद्ध तींत तक्रारी केल्या आहेत.

श्रीराम

यादी राजेश्री केशवबावा आह्मावरी दया करीताती तपसील व देश स्छळाचा श्री च्या

१ गउंडरे हीरोन घ्यावे गुजारत रा। जनार्दनबावा व समस्त महंत-सभा चाफळ

१ रा। राघोबा यास श्री स्छळी आणावें अह्मास काढावें गु। राजेश्री राघोबा बावा

१ कर्णा कां नेला त्याचे पैके घ्यावे गु। अनंतबावा हरीबावा

१ घोडीवरी कां बैसतो ह्मणोन नेली गु। हरीबावा

१ श्रीचे इमारतिस गौडा होता त्यास रुपया यक दीधला तो बीज

१ मज पत्र श्रीस्छळीं समस्त बंधु महंतानी दीधले जे तुमचे मोडील तो गुरुद्रोही ते पत्र नेलें गुजारत रा। सीवाजी बावा

१ वाराणसीहुन आले कलागत करून श्रीचीं वस्त्र मेखळा रु २५ व सखलाद नासील गु। हरी गो।

१ राजाराम देशमुखाने श्रीचे दा-शत्व करीनसा हेत धरीला त्यास फांटा मारीला गु। शकराजी व तुळाजी पा।

उवारी (चे विकु)न घेतला
गुा मु(ऱ्हार)

१ तुफान आह्मावरी घेतले होते
गुा खीरा

१ सीश्यसमुदाय करूं नये परमार्थ यासी काषास व्हावा याने
बळावों नये गुा अनत बावा

१ दाहा लोक समागमे घेउनि ठेभ्याने यानें यउ नये तोरा धरूं नये
गुा पश्चम प्रांतीचे लोक

---

११

या खेरीज कीत्येक आधीक उणी दया करीताती ते श्री साक्ष
आहे छ

अशा ह्या अकरा तक्रारी आहेत. "वाराणसीहुन आले" याचा संबंध बहुधा समर्थकल्याणांच्या अस्थि केशवस्वामी वाराणसीस पोंचवून परत आले त्याच्याशीं असावा. गुजारत=द्वारा. कोणाच्या द्वारा कोणती गोष्ट केली तें प्रत्येक तक्रारींत सांगितलें आहे.

---

**लेखांक ४४७ ]** **१६६९ कार्तिक वद्य ३**

श्री शाहु छत्रपति यांनीं मौजे डोंबगांव व मौजे गोंडरे हीं दोन गांवें कल्याणस्वामींच्या मठास इनाम करून दिल्याची ही सनद आहे.

श्री

रामदास




स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके ७४ प्रभवनाम संवत्सरे कार्तिक

बहुल त्रितीया इंदुवासर क्षत्रियेकुळावतंस श्री राजा शाहु छत्रपती स्वामी याणी हरिभक्तपरायेण राजश्री मुनोत्रा कल्याण गोसावी संप्रदाये श्री स्वामी यांसी दिल्हे इनामपत्र ऐसे जे तुह्मी शाहु-नगरनजिक किले सातारा येथील मुकामी स्वामीसंन्नीध







निवेदन केले जे आपले गुरु राजश्री कल्याण गोसावी यास श्रीच्या उत्छवास व मठीच्या खर्चास मौजे डोंबगाव व मौजे गोंडरे पा। हवेली परंड हे दोनी गाव पुर्वी इनाम होते त्याप्रमाणे माहाराजस्वामीनी आपली पत्रें करून देऊन देहाय मजकूर इनाम चालविलें आपले गुरु शांत जाहलीयावर हरदु गांव श्रीचा उत्साह व नित्य पुजा नैवेद्य नंदादीप व मठीं अतीतअभ्यागतास अन्न द्यावया करिता करार करून अधिपत्य आपल्या स्वाधीन करून पत्रें करून दिल्ही त्याप्रमाणे हरदु गांव इनाम चालत आहेत आपलें नावे इनामपत्र दिल्हें होतें तें गत जाहाले तरी माहाराज स्वामीनी भोगवटीयास पत्र करून देऊन वंशपरंपरेनें चालविले पाहिजे म्हणून निवेदन केलें त्यावरून मनास आणितां हरदु गांव तुमचे गुरु कल्याण गोसावी यास पुर्वीपासून इनाम होते ते शांत जाहलीयावर तुमचे गुरूचे मठीं श्रीचा मोहोछाह व नित्य पुजा नैवेद्य नंदादीप व अतीतअभ्यागतास अन्न व मठीच्या खर्चाचे अधिपत्य तुमचे स्वाधीन करून हरदु गाव मुकास बाब देखील बाबती व सरदेशमुखी व साहोत्रा व हुजूर वसुली चौथाई व कुलबाब कुलकानु हालीपटी व पेस्तरपटी खेरीज हकदार व इनामदार करून इनाम करार करून पत्रें करून दिल्हीं त्याप्रमाणें तुह्मी अनभवीत होता त्यास मध्यें श्री चे नातु राजश्री गंगाधर गोसावी यांजकडे मौजे गोंडरे व तुह्मा-

कडे मौजे डोंबगाव दिल्हे होते त्यास मनास आणितां तुमचे गुरु कल्याण गोसावी यांचे मठी श्रीचा मोहोत्सव नित्य पुजा नैवेद्य नंदादीप व अतित अभ्यागतास अन्न व मठच्या खर्चास दोनी गांव पाहिजेत ऐसे मनास आणून हरदु गांव पूर्ववत् प्रमाणें तुम्हाकडे करार करून राज्याभिषेक शके ६४ पींगलनाम संवत्सर अश्वीन शुध प्रतिपदेस पत्रें करून दिल्हीं त्या प्रमाणें दोन्ही गांव तुम्हाकडे मुकासबाब देखील बाबती व सरदेशमुखी व साहोत्रा व हुजुर वसुली चौथाई कुलबाब कुलकानु हल्लीपटी व पेस्तरपटी खेरीज हकदार व इनामदार करून तुमचे गुरु राजश्री कल्याणगोसावी यांचे मठी श्री चा मोहोत्सव व नित्य पुजा नैवेद्य नंदादीप व अतीतअभ्यागतास अन्न व मठच्या खर्चास हरदु गांव पूर्ववत् प्रमाणे करार केले असेत तरी तुम्ही व तुमचे शिष्य परंपरेने हरदु गावचा ऐवज साल दरसाल वसूल घेऊन सदरहु प्रा मठचा खर्च चालऊन इनाम अनभऊन सुखरूप राहाणे जाणिजे लेखंनालंकार[1]




रुजु सुरु
नीवीस

संमत सा सा
सुमंत मंत्री सरकार

बार सुद सुरु सुद बार बार बार बार

या दोन गांवांची हकिकत अशी दिसते. हीं दोन्हीं गांवें श्रीशिवछत्रति यांच्या वेळेपासून मुख्य चाफळ मठाला इनाम होतीं. तीं तशीं च त्या मठाकडे कित्येक वर्षे चाललीं. ( लेखांक ९५, ९९, १०७ पहा ). पुढें जेव्हां कल्याणांची स्थापना त्या प्रांतीं झाली त्या वेळीं बहुधा हीं गांवें त्यांच्या कडे लागलीं. पुन्हां पुढें गंगाधरस्वामींच्या कारकीर्दीत कांहीं घालमेल झाली असावी. केव्हां डोंब-

---

१ हस्ताक्षर राजे यांचे.

गांव तर केव्हां गोंडर पुन्हा चाफळमठाकडे आलें असावें. ( ले. २३८ पहा). प्रस्तुतच्या (**अस्सल-मोडी**) सनदेनें हीं दोन्हीं गांवें कल्याणांच्या मठाकडे कायमचीं आलीं व तीं तेव्हां पासून त्यांच्या कडे चालत आहेत.

---

**लेखांक ४४८**] १६७० पूर्व [**अस्सल-बाळबोध**

श्रीरामवरद ॥

जे निगमांबुधीचे सुधांशं[1] ॥ मुमुक्षचातकाचे तृत्पपाशं[2] ॥ किं निर्विकल्पद्रमपादपांस ॥ भवदरीद्रारि सुखदाते ॥ १ ॥ मोक्षश्रीया विराजीत राजेश्री जगंनाथबावा बंधुवर्ग यांप्रति रघुनाथनामनेन नमस्कार विज्ञापना ऐसी जे मातुश्री आई तुमचा मार्ग बहुत लक्षीत राहीलि भेटि व्हावि ऐसी तिची ईछा फार आहे आपलें वृधाप्य आहे ऐसे ह्मणति भेटि जालिया उत्तम आहे या स्थळि बोलावावें हा सन्मान पाहावा ऐसें नाहिं त्यामधें तुह्मी विवेकी असां श्री चांफळि भेटी घेतलि परंतु ते गुप्त भेटी घेतलि यास्तव चीत्त विस्मीत जालें किं तें प्रगट करायासी न ये हस्तीनें उर्णतंतें बांधोनि घेतलें ऐसें जालें यास्तव प्रगट होईल ह्मणोनि पुसीलें नाहीं आतां आगत्य आगत्य करुनि मातुश्रीचे व श्रीचे भेटीस येणें बहु काये लिहिणे तुह्मी सर्वज्ञ आसा हे वीज्ञापनां ॥

१ सुधांशु= चंद्र. २ पिपासा=तहान. तहान शमविणारे, असा भावार्थ दिसतो. जगन्नाथ महाराज मूळचे राहणारे कोठचे हे समजल्याशिवाय त्यांच्या मातुःश्री भेटीची अपेक्षा करीत होत्या ती कोठें हे कळत नाहीं. चाफळीं श्रींची गुप्त भेट घेण्यांतील मर्म हि लक्षांत येत नाहीं.

---

**लेखांक ४४९**] १६७० ज्येष्ठ शु.७ [**नक्कल-मोडी**

श्री

नकल रामदासस्वामी

सीका

छत्रपति

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके ७५ विभवनाम संवछरे जेष्ट सुध ७ सप्तमी

इंदुवासरे क्षेत्रियेकुलावतंस श्री राजा शाहु छत्रपति स्वामी याणीं हरिभक्तपरायण शिवाजी मुधोबा गोसांवी संप्रदाये श्री यांसी

सीका पेशवे    सीका प्रतिनिधी

दिल्हे इनामपत्र ऐसी जे तुह्मीं सातार मुकामी विदित केलें जे डोमगांव येथील श्री चे व समाधीचे पुज्या नैवेद्य उछाह व अतीत अभ्यागत यथास्तित चालावा ह्मणोन इनाम गांव दिल्हा त्याचे भोगवटियासी पत्रें करून दिली पाहिजे त्यावरून मनास आणितां तुह्मीं सत्पात्र हरिभक्त-परायण प्रतिवर्षी श्रीचा मोहछाह व नित्य अतीत अभ्यागतास अन्न संतर्पन करीत आहां तुमचे साहित्य केलें असतां स्वामीस व राज्यास श्रेयेस्कर ऐसे जाणून मठाकडे देह चालत आले ते इनाम करार दिल्हे बी॥

प्रगणे हवेली पै॥

२ मौजे डोमगांव मौजे गौडर हे श्रीस्वामी कडील पेशजी पासून चालत आले ते

२ मौजे बारलोणी व मौजे राहसे बालाजी पंडित प्रधान याणी विनंति करून इनाम करून देविले ते

―――

४

दरुनी माहाल वाडा पहिला यानी आपली पत्रें करून देऊन विनंति करून इनाम देविले ते देह

१ मौजे बलवंडी पै॥ करडे

१ मौजे सांगवी ता॥ पेडगांव प्रा॥ कडेवळीत

―――

२

―――――――――――――

६

येकून साहा गांव येथील स्वराज्याचा अमल मोकासा व बाबती व साहोत्रा व वासदाणा चौथाई देखील सरदेशमुखी कुळकाणु हासील महसूल दरोबस्त इनाम हलीपटी पेस्तरपटी जलतरुतृणकाष्ठपाषाणनिधिनिक्षेप-सहित खेरिज कदिम इनामदार व हाकदार करून करार करून भोग-वटियास हे पत्र तुह्मांस करून दिल्हे आसे तरी तुह्मीं वडिलांचे सिष्य-

परंपरेनें आनभऊन सुखरूप राहाणे जाणिजे लेखनालंकार मोहोर

जोडबंदावर मोहोर

| | | | |
|---|---|---|---|
| रुजु सुरु | सा। | सा। | सा। |
| निवीस | सुमंत | मंत्री | सरकार |

तारिख ६ जमादिलाखर सुग तिसा आर्बान मया अलफ

बार सुद सुरु सुद बार बार बार बार

१ राज्याभिषेक शक ज्येष्ठ शु. १३ पासून सुरू होतो, पण तो या पत्रांत चैत्र शु. १ पासून च धरलेला दिसतो. २ मुद्गलांची समाधी-तिथी १६७१ ज्येष्ठ शु. १४ असून त्यांच्या हयातींत च शिवाजी-बावांच्या नांवानें ही सनद कां झाली याचा विचार केला पाहिजे. ३ ‘ अन्तःपुरं तु दरुनी ’ ( राजव्यवहारकोश ). दरुनी माहाल वाडा पहिला= छत्रपतींच्या पहिल्या राणीसाहेब. ४ एरव्हीं नुसतें ‘ शिष्य परंपरेनें ’ ह्मटलें असतें, ‘ वडिलांचे शिष्यपरंपरेनें ’ ह्मणण्यावरून मुद्गल हयात होते असें दिसतें.

---

लेखांक ४५० ] १६७० पूर्व [ अस्सल-मोडी

श्री

जगंनाथ गो। आसीर्वाद

जिरंजीव रामचंद्र गो। मोकासी मौजे साजें यां उपरी तुम्ही जाते वेळेस आपणास पुसोन न गेलां आपला तगादा लागेल म्हणोनी भेणे गेलेती हे थोरांची रीती न्हवे उगे च भेटोनी जावे होतें कितेक काम सां। होतें तें आवघे च राहिले बरे होणारास काये येत्न आहे लोभ तरी आसों देणे कळले पो।

१ “ चिरंजीव रामचंद्र गोसावी मोकासी मौजे साजें यांप्रती जगंनाथ गोसावी यांचा आशीर्वाद ” असें हें पत्र वाचावयाचें. २ हे रामचंद्र कोण तें निश्चयानें सांगतां येत नाहीं. जगन्नाथांचे गुरुबंधु आपचंदमठपति शिवराम त्याचे शिष्य जे रामचंद्र ते च हे बहुधा असावेत. शिवरामांच्या पश्चात् रामचंद्र हे जगन्नाथांच्या जवळ कित्येक वर्षे रहात होते.

लेखांक ४५१ ] १६७१ पूर्व [ अस्सल-बाळबोध

श्रीरामसमर्थ ॥

बंधुवर्ग मुद्गलगोसावी यांप्रति विज्ञापना ऐसी जे तुम्ही या प्रांतासी आलेसी परंतु येथें दोनी दिवस राहीले नाहिंस तुमची भेटि आम्हासी जालि नाहीं मनामधें किंचीत बहुत संतप्त आहे तें तुमच्या शब्द-गौरवें समाधान होये ऐसी इछा होति परंतु ये वेळेसी प्रसंग वीपरीत दाखवीला ऐसें आपणासी न पाहीजे तुमची आमची वीचारणा ऐसी नाहीं कि ऐक्यता भंगावि तथापी भंगली तरीं सुटिका नाहीं का जे मुळि दृष्टी घालुनी पाहाणें यके [१]ठ च वाढलों शरीरमात्र भीन्न आसे वरकडांसारीखा प्रसंग नाहीं म्हणोनी शब्दाचि पुसी मागुति केलि बरें त्यामधें इश्वरासी माने ऐसें केलें पाहीजे ॥ बरें तथापी तुम्ही जमाव करून या प्रांतासी आलेसी आह्मासी या भुशणापुढें मेरु ही तुछ जाला यवढें समाधान वाटलें परंतु तुम्ही च येउनी आम्हासी तुछ केलें आम्हापासुनी लघुत्वें करुनी अंतर पडीलें आसीलें तरी लोकांत गौरव देउनी सांभाळावें ऐसा धर्म आसे कां जे तुह्माकडे बुधीवैभव वीशेश आसे वडील आसां म्हणोनी लिहीलें बरें ऐसें ही श्री च्या चीत्तांत होतें तैसें जालें तुम्हास बोल काये ठेवावा होणार तें होउनि गेलें परंतु उत्तम जालें नाहीं बहुत काये लिहीणें तुम्ही सर्वज्ञ आसा योग्य आसेल तें करणे हे वीनंति[३]

१ बहुधा साताऱ्याकडे. २ " स्थळीं " ह्मणावयाचें असेल. " ळीं " हस्तदोषानें गाळली गेली असावी. ३ मुद्गलांना हें पत्र कोणी लिहिलें असावें त्याची अटकळ होत नाहीं. भाषा गोड व निर्भीड आहे.

---

लेखांक ४५२ ] १६७१ पूर्व [ अस्सल-बाळबोध

श्रीमत्कल्याणस्वामीप्रसन

उत्तमगुणनिधान ॥ कीर्तीतेजो जैसा रवी पूर्ण ॥ ब्रह्मांड हें शोभाय-

मान ॥ प्रतापकीर्णे ॥ १ ॥ हा ही दृष्टांत येकदेसी ॥ सवीता आदृष रजनिसी ॥ प्रताप साधु श्रीरामचेंद्र त्रयेलोक्यासी ॥ पाळीताहे ॥ २ ॥ कीर्तीमकरंद उत्तम ॥ सुमनजातीचा त्यात ही वीशेष गूण ॥ जें सुगंध मृद पूर्ण ॥ आवीट आसे ॥ माहाराज राजेमान्ये राजेश्री मूद्गलबावा व मून्हारबावा व निळकंठबावा व समस्त मंडळी यांसी आणाजी नामन्ये साष्टांग नमस्कार वीनंती उपरी तुम्ही हरबाजी बराबर पत्र पाठवीलें तें पावलें लीहीला आभीप्राव कळों आला आम्ही पंचमाहालांतुन येती वेळेस रो जगनाथबावा व सीवाजीबावा व हूलकीकर सीवाजीबावा गो॥ यानि पूर्ण भरवसा दील्हा कीं खाये ना खाय रामनवमीस येतों तूम्ही ही वचन दील्हे रो॥ केषव बावानें सर्व मंडळीणें वचन दिल्हे यास्तव रो जाधवरायास व सर्व सरदारासं व सर्व लोकांस सांगीतलें कीं सर्व मंडळी रामनवमीस येत आहे तुम्ही पत्रामध्ये लीहीलें कीं पूण्ये-तीथीस येणें तर येथील साहील्ये जालें पाहीजे दूसरा कोण्ही येक पूरुष आसता त्यावर धंदा टाकुन येतों माझे ठाई सर्वस्वं तुम्हीं आहां म्यां यावें अैसा आर्थ नाही ज्या गोष्टीनें लोकीक बरा दीसल आमचें चीत्त स्वस्त होईल त्या गोष्टीत मन घालुन सर्व मंडळी घेउन रामनवमीस आलें पाहीजे जे कीत्येक लोक वाट पाहत आहेत ईस्त्ररें येक बरें केलें कीं निज्यामनमूलुख भागानगराहुन च्यार मजली आरकत्याकडे गेला जाधवराव खाये ना खाये रामनवमीस येताहे जरूर जाणुन आप-णास लीहीलें ईमारतीचे वीषई लीहीलें तर तूह्मास आम्ही वचन दील्हें होतें तो अैवज सीद्ध करून ठेवीला उपरांतीक मग बोलांउं पाठवीलें याहीवर आनुमान जाला तर पून्हा दर्शन होयाचें दीसत नाही यामध्यें तूम्ही वीवेकी थोर आहां तुमच्या सर्वांच्या वचनावरून सर्व लोकांस जाईर केलें॥ ज्या गोष्टीनें माझी आगत्ये ते तुमची आगत्ये रो तुकोबा व वेंकु मूखवचनें सांगतां वीदीत होइल सर्व मंडळीनें आगत्ये आगत्ये आलें पाहीजे गई न कीजे बहुत ल्याहावें तर मीं दीन आज्ञान आसें सनिधवासी लहानथोरांस नमस्कार आनेक आसीर्वाद सांगावे

हें पत्र महत्त्वाचें आहे. विशिष्ट हेतु मनांत धरून श्रीरामचरित्राकडे सर्व सरदारांचीं मनें वेंधून घेण्याचा प्रयत्न श्रीसमर्थांच्या पश्चात् हि कसा होत होता याची अटकळ या पत्रावरून होते. महाराष्ट्रांतील निरनिराळ्या मठांत एक एक साल रामनवमीचा उत्सव विशेष प्रमाणावर होत असून सर्व जण त्या वर्षी त्या ठिकाणी जमा होत असावेत, असें वाटतें. मुद्गल, मुऱ्हार, नीळकंठ, जगन्नाथ, शिवाजीबावा–शिवरामस्वामी आपचंदकर, हलकीकर शिवाजी गोसावी–शिवराम गोसावी हलके लातूरकर, केशव बावा हे सर्व कल्याणांचे शिष्य होत. ( विविध विषयांक ५० व मालेंतील तिसऱ्या भागाची प्रस्तावना पहा. ) ते सर्व या वर्षी कल्याणशिष्य आण्णाजी बावा यांच्या कडे उत्सवास जाणार होते. आण्णाजी बावा प्रथम भालकीस रहात. इतिहासप्रसिद्ध रामचंद्रराव जाधव यांचे ते समकालीन होत. रामचंद्ररावांचा कबिला भालकीस गढींत असे व ते स्वतः भातंबरे गांवीं किल्ल्यांत रहात व त्यांच्या च आग्रहावरून आण्णाजी बावा भातंबऱ्यास रहावयास गेले. हा जो उत्सव व्हावयाचा होता, तो भातंबरे येथें होय. भालकी, भातंबरे हीं गांवें बालाघाट प्रांतीं आहेत. निजामानें भागानगराहून अर्काटकडे मोर्चा फिरविल्यामुळें आतां आपणांस उत्सव मनाप्रमाणें साजरा करावयास सांपडणार, याविषयीं आण्णाजीबावांनीं संतोष व्यक्त केला आहे. इमारतीविषयीं लिहिलें आहे, ती इमारत ह्मणजे बहुधा कल्याणांचे समाधीमंदिर होय. त्या मंदिराचें काम १६९५ त पूर्ण झालें, हे आपणांस ठाऊक च आहे.

---

**लेखांक ४५३ ]** १६७१ पर्व **[ अस्सल–बाळबोध**

श्रीराम

मोक्षश्री राजेश्री हरीबावा व रा। तीमाजी नाईक व समस्त मंडळी यांप्रती मुद्गलनाम्ने कृतानेक नमस्कार व आनुक्रमे आसीर्वाद उपेरी श्रीनौमी शनीवारीं तरी दया करून सहमंडळीसी येणे व रा। रामोजी दादानी देहे ठेवीला बारामतीस माघ शुद्ध नौमीस जाले सखु मुरारी जवळी होता मग करमळीयास ति आली तेथुन उत्तरकार्य करायास येथें आली आहेत सहकुटुंबें ब्राह्म(णा)चा त्या ही कचकामधे च पडीला

बुधवार पावेतो यानंतर केळीचीं पानें व वीड्याचीं व पीठ लाह्याचें आणावयास तटाणी पाठवीली केदारीबराबरी व धोत्र जोडा येक कीमत ३८ व लुगडे येक गोपीकाबाई ही आली आहे यका दों रोजांत येईल तीजयोग्यें लांब रुंद परवाच्या सारीखें त्याहुस उंच व काळें मुगे आगर आणी जीनस वार १ कीमत ३ माणीकरायाचे बाइलेस पाहीजे पैका ही देउ बहुत काये लीहीणे व स्वयंपाकाचा ब्राह्म(ण) आगत्य येक दोनी घेउन येणें व आनंदीस स्वयंपाकाचे झट लाउनी दोनी ब्राह्मण मीळउन घेउन येणे हे वीनती

कृष्णा आला कुंचा आणीला आहे केदारीबराबरी जतन होईना ह्मणोन ठेविला आहे आनंदीस आसीर्वाद सत्वर येणें घेउन हे वीनती

१ हरि बावा भूमकर हे कल्याणांचे शिष्य होत. २ रामाजी दादा बारामतीकर हे हि कल्याणशिष्य होत. रामाजी दादांची निधनतिथी माघ शु. ९ होय. शक कोणता असावा ? पुढची रामनवमी शनिवारीं होती. शक १६५०, १६६०, १६६७ तील रामनवमीला शनिवार होता. यांपैकीं मला वाटतें, रामाजीदादांचा निधनशक १६६६ असावा. केदारी, गोपिकाबाई, माणिकराय, आनंदी, कृष्णा ही सर्व मंडळी कोण, तें कळण्यास तूर्त साधन नाहीं.

---

लेखांक ४५४ ] १६७१ पूर्व [ अस्सल-बाळबोध

श्रीकल्याणस्वामी

श्रीरामचंद्र

रघुनाथदासां कल्याण व्हावें ॥ आती सौख्य व्हावें आनंदवावें ॥ उद्वेग नासो वरी शत्रु नासो ॥ नाना विळासें मग तो विळासो ॥ १ ॥ राजेश्रीया वीराजीत राजेश्री पंत यांप्रती स्नेहपुर्वक मुद्गलनाम्ने कृतानेक नमस्कार विनंती उपरी कित्येक श्री देवाचें कार्य आपणापासीं होणें आहे यानीमीत्ये गोसांवि पाठविले आपणाकडे तरी श्री प्रीत्यर्थ करणें ॥ परोपकाराचिया रासी ॥ उदंड घडती श्रीरामचंद्रभक्तांसी ॥ तयाच्या गुणमहत्वासी ॥ तुळणा नसे ॥ १ ॥

मकसुद जो गोसांवि व देशमुख सांगतील ते भीक्षा श्री स देणें बहुत काये लीहीणें हे वीनंती

हे विनंती

कोण पंत तें दिलें नाहीं, यावरून असें वाटतें कीं, सर्वांना पाठवि-ण्याच्या पत्राचा हा एक सर्वसामान्य मसुदा असावा.

१ मख्सूदःस्यादभिप्रायो। ( राजव्यवहारकोश ). २ सबंद पत्र सं-पल्यावर मध्यें बरें च अंतर सोडून पत्राच्या अगदीं तळाशीं पुन्हां ' हे विनंती ' आहे.

---

**लेखांक ४५५ ]** **१६७१ पूर्व** **[ अस्सल-बाळबोध**

श्रीरामसमर्थ

हा ची मातुश्री बाईचा आसीर्वाद | हा ची हरीबावास नमस्कार | मोक्षश्री मुरारबावा व नीळकंठबावा यासी नमस्कार लिखीतार्थ परीसीजे लोभ आसो दिजे

जे मोक्षश्रीयचे सुरतरु । त्या नीगमफळांतिल तुं ची मधुरु । आनंद-मेघांतील गारु । ऐक्यात्मकरूपें ॥ १ ॥ विजयश्रीया विराजीत मुद्गल-बावा यांप्रति बंधुवर्ग रघुनाथनामने नमस्कार विनति ऐसी जे आपणा-कडील वर्तमान रा निळकंठबावा आलिया तागाईत कळत नाहिं यास्तव चित उदिग्न आसे आमचें वर्तमान तरी आधीक वद्य त्रयोदशी रवीवारपर्यंत सुखी आसों मध्यें कांहिं ज्वरउपद्रव जाला होता तो शांत जाला आतां श्री दयनें आरोग्य जालें आहे कळलें पाहीजे तुह्मा-वेगळें विशेश आह्मासी कोणी नाहीं ह्मणोनी लिहीलें सांभाळ करीत गेले पाहीजे रामाजी गो मुखवचनें सांगता वर्तमान वीदित होईल ब-हुत काये लिहीणें हे वीनति १००००

श्री श्री श्री

हें ची श्री मंडळिस आसीर्वाद लोभ आसों देणें ॥

"आधीक वद्य त्रयोदशी रवीवार" या मित्तीचें हें पत्र आहे. शक तर नाहीं च पण महिन्याचें नांव हि दिलें नाहीं. १६५० पासून १६७१ पर्यंतचे सर्व अधिक मास पहातां १६५२ च्या अधिक भाद्रपद व. १३ ला च फक्त रविवार होता. यावरून हें पत्र १६५२ च्या अ. भाद्रपद व. १३ चें ठरतें.

---

**लेखांक ४५६ ]** १६७१ पूर्व **[ अस्सल-बाळबोध**

श्रीरामसमर्थ ॥

मोक्षश्रीया विराजित सद्गुरुभक्तिपरायेण राजेश्रीया विराजित मुद्गलबावा यांप्रति परमश्नेहपुर्वक रघुनाथनाम्नेन नमस्कार विषेश वर्तमान तरि वडिलांचें स्छळ रक्षुन तुमच्या आश्रयें सुखरूप होतों ऐसियासि जैसें सुर्यप्रकाशें कमळणि विकासातें पावतात या प्रकारें होतों त्यास कोणियेका प्रकारें आतर पडों दिल्हें नाहि पुर्वापर श्री समर्थापासुन आवल जमिन बिघे बाविस यांच्या वडिलानि चतुसिमा करून दिल्ही आसतां यासी शंभरी वरुशें भोगवटा चालत आंसतां हे गोष्टि सर्वत्रांस दखल आहे त्यास येक आकरकि वडिलाचि चतुसीमा मोडुन माळावरि दिल्हें आहे दुसरे आकरकित आवाडावि करून बांद फोडुन झाडें लावणिचीं तोडुन विध्वंस केला आहे त्यास तुह्माकडे येउन नाना प्रकारिचे कुफराने घेउन आप्रमाद बोलोन तुमचें आभये घेउन आले आहेत त्यासी येथें कुळवकाठि चालों देत नाहितं ऐसीयासि यासि काय आज्ञा आहे ते कळलि पाहिजे आह्मांस तों येथें राहो देत नाहित त्यास स्छळें तुमचि आभीमान तुमचा ज्या रितीनें सांभाळ कराल त्या रितीनें करा आपुलें उतर आलिया उपरांतिक स्वामि बुध्दि देल तैसी वर्तुणुक करूं विशेश आंतर कित कितेक चितात बैसले आसतिल लोकापवादें करून थारले आहेत ते जैसे सीतेचे आंगि गुणदोश नसतां बळें चि दिव्य घेतविलें तैसें आह्मांस हि समर्थाच्या पादुकावरिल तुळसी काढुन आपुल्यास प्रमाण द्यावें य गोष्टीचा हेत फारसा आहे त्यास यत्नेंकरून हें आपण केलें पाहिजे कोणाचा घात-

पात करावा ये गोष्टीचा विभाग जगदिशापासि मागोन आलों नाहि हें प्रमाण आसतां जें तुमच्या थोरपणास गोष्टि येइल तें करणें बहुत काये लिहिणें प्रतीउतराचा मार्ग लक्षितों लोभ निरंतर आसों दिला पाहिजे हे वीनती ॥

मालेंतील कागदपत्रांच्या नवव्या भागांतील लेखांक १७, २१ वगैरे पाहतां आदिलशाहीपासून वडगांवीं इनाम होतें, असें दिसतें. शंभर वर्षे भोगवटा चालत होता, असें या पत्रांत ह्मटलें आहे. तेव्हां पहिलें इनाम १५७१ च्या सुमाराचें असलें पाहिजे. त्या इनामांत ढवळाढवळ करणारे कोण त्यांचे नांव दिलें नाहीं. नुसतें " यांच्या वडिलानि " ह्मटलें आहे, पण यांच्या हे कोण तें न दिल्यामुळें कुफरानें घेणारे हे कोण तें समजत नाहीं.

---

**लेखांक ४५७ ]** १६७१ पूर्व **[ अस्सल-बालबोध**

श्रीरामदासो जयति ॥

बंधुवर्ग मोक्षश्रीया वीराजीत मुद्गलगोसावींयांप्रति परम प्रीतीपुर्वक रघुनाथनामनेन श्नेहवीज्ञापना ऐसी जे आपण आमुच्या परामृशाकारणें रुद्राजी गो पाठउन दिधला तेणें करून परम समाधान जालें तें पत्रीं लिहीता पुरवत नाहीं वीशेश तुम्ही त्या प्रांतासी जातां ऐसें वर्तमान कळों आलें तेणें करून चीत उदास वाटतें बरें रुणानबंधें भेटीस येतां कळलें पाहीजे यथील वर्तमान तरी बहुत चि बचबच जालि आपण श्रम केला तो श्री स ठाउका आहे त्यास वीज्ञापना केळी कि यक नीर्वेध पत्र करून दिलें पाहीजे हे गोष्टी त्याच्या चीत्तास यत नाही आम्हासी म्हणतात कीं तुमच्या नावें नीर्वेधपत्र करून देउं नाहीं तरीं शीशपरंपरा करून देवत नाहीं ऐसें ह्मणतात त्यास आह्मास तुमचा वीश्वास आहे गोष्टी तसी श्रुत केली वीशेश गंगाधराचे मनी आमचें आभीष्ट नाहीं ऐसा वीचार जाला आहे त्याची येथें क्षणक्षणा पत्रें यताती ऐसें जालें त्यासी आपण कोणे गोष्टीची चींता न करणे तुह्मी आम्ही ऐक्य आसतां काय चींता आहे फुटी न करणें लोभ

आसों देणे क्षणक्षणा परामृश करीत जाणें हे वीज्ञापना ॥

¹ असें दिसतें कीं मुद्गल चाफळास आले असावेत व ते तेथें असतां त्यांना वडगांवाहून रघुनाथांनीं हें पत्र लिहिलें असावें.

---

**लेखांक ४५८ ]** १६७१ पूर्व **[ अस्सल-बालबोध**

श्रीरामदासो जयती ॥

शडगुणऐश्वर्यसंपन्न शुत्धसत्वशिळविराजीत राजेश्री

मुद्गलबावा याप्रती रघुनाथनाम्ने

परम स्नेहपुर्वक कृतानेक नमस्कार उपेरी आपुलें वर्तमान तरी श्री द-येनें जेष्ठ शुद्ध द्वीतीया रवीवासरपर्यंत समस्त सुखरूप आसेती वि-शेश आपणांकडील वर्तमान राजेश्री रामाजी गोसांवी याहीं मुखवचनें नीवेदन केलें स्वस्तरूप ऐकोन परम संतोश जाला तो पत्रीं लीहीतां पुरवत नांहीं रघुवीर स्वस्तरूप दया करो वीशेश आह्मांकडील वर्तमान स्थुळ सुक्ष्म लीहीता पुरवत नाहीं मुखवचनें साकल्य नीवेदन होईल श्रीची पुर्ण दया आसता काय चींता आसे सकळ नीर्वाह करणार स-मर्थ आसेती बहुसाल विचारवंतासी लीहीणें लागत नाहीं आपण येक वेळे श्री दर्शनास येणें बहुत काय लीहीणें कृपा लोभ आसों देणें हे वीनंती ॥

हें ची मुरारबावा या नमस्कार

रा हरीबावास नमस्कार

---

**लेखांक ४५९ ]** १६७१ पूर्व **[अस्सल-बालबोध**

श्रीकल्याणस्वामी

श्रीगुरुभजनपरायेण मोक्षश्रीया विराजीत राजमान्ये राजेश्री हरीबावा यांप्राति मुद्गलनाम्ने कृतानेक सा। नमस्कार विनंत्ती उपेरी येथील क्षेम जाणउन आपण लीहीत जाणें यानंत्तर श्री ची आषाडी¹ संन्नीध आली आणी आपण गंगेस जायाचि वीचारणा केली एसें एकीलें

---

१ कल्याणस्वामींची पुण्यतिथि आषाड शु. १३

सकरापास बोलावीलें त्यावरून कळो आलें तरी एसें न कीजे इतके दिवस जाले तैसे चि हे हि आठ दाहा दीवस सबुरी कीजे त्रयोदसी श्री ची करून मग जाणें यवीसी आनमान न कीजे आपण आण घालावि तरी तुम्ही सांगीतलें जे आण काशास लीहीता आपण श्री च्या कार्याची गोष्टी मोडीत नाहीं तरी आषाडी जाल्यावरी मग जाणे हे विनंत्ती लक्ष ००००० राजेश्री तीमाजी नाईक व राजेश्री भुतोजी नाईक व रा गोपाळ नाईक यासी नमस्कार उपेरी राजेश्री बावास घेउनि येणें गई न कीजे त्यास आमचे वारीची वीज्ञापना कीजे हे वीनती

---

लेखांक ४६० ] १६७१ पूर्व [ अस्सल-मोडी

श्री

तीर्थस्वरूप राजश्री मुधोबावा गोसावी स्वामीचे सेवेसी आपत्ये सौभाग्यादिसंपन्न सखवारबाई[1] दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत गेले पाहिजे यानंतर प्रस्तुत आपणाकडून पत्र येऊन वर्तमान कलत नाहीं तर ऐसे न करावे संदैव आसीर्वादपत्री साभाल करीत गेले पाहिजे विशष तुह्माकारणे लग्नाचे पोशाख पाठविले आहेत त्याची यादी आलाहिदा आहे त्याप्रमाणें घेऊन उतर पाठऊन देणें जाणिजे छ २३ सफर[2] बहुत काये लिहिणे हे विनंति

येमाजी[3] राजे नींबाळकर

---

लेखांक ४६१ ] १६७१ पूर्व [ अस्सल-मोडी

श्री

तीर्थस्वरूप राजश्री मुधोबावा स्वामीचे सेवेसी

---

१ श्रीशाहु छत्रपति महाराज यांच्या पत्नी. यांनीं मुद्गलांचा अनुग्रह घेतला होता, असें दिसतें. २ येथून अक्षर निराळें. ३ हें नांव बाळबोधींत असून पत्राच्या मागील बाजूस आहे.

आपल्येसमान सौभाग्यादिसंपन्न सकवारबाई कृतानेक दंडवत विनंती येथील कुशल स्वामीच्या कृपेने जाणून स्वकाये कुशललेखनआज्ञा केली पाहिजे विषेस स्वामीकारणे पालखी सरंजामसुधा पाठविली आहे कृस्णाजी गोसावीयांसमागमे पालखी पाठविली आसे पावलीयाचे उतर पाठवणे निरंतर आसीर्वादपत्र कृपेचे पाठऊन संतोशवीत जाणे जोत्याजी चंदर हुजरे व गोसावी याजबा पाठविली आहे छ १४ मोहरम पालखीस रुपये ७०० दिल्हे त्यांत पालखीचे सामानांस येथे दिल्हे रुा १८८ बाकी रुा ५१२ पांचसे बारा गोसावीयाबा व हुजरे याजबा पाठविले ते भोयांस देत जाणे स्वामींनी पालखीत बसत जावे बहुतं काये लिहिणे हे विनंती

---

लेखांक ४६२ ] १६७१ पूर्व [ अस्सल-बाळबोध

श्रीरामवरद ॥

हा मातुश्रीचा
आसीर्वाद

मोक्षश्रीया विराजमान राजेश्री मुद्गल गोसावि बंधुवर्ग यांप्रति परमश्नेहपुर्वक रघुनाथनामनेन नमस्कार उपरी आह्मी श्री दयस्तव जेष्ट वद्य यकादशी मंगळवासरपर्यंत समस्त सुखी आसेति विशेश तुह्मी या प्रसंगी पत्र पाठउन परामर्श केला य गोष्टीने मोठा हर्श जाला तो लिहीतां पुरवत नाहिं आमचा वास तों या प्राती जाला आहे वायसामधे राजहंस कांही कर्मदोशास्तव पडीला यदन्याये जाला आहे बरें ईश्वरइत्छा प्रमाण कोणांस काये शब्द ठेवावा आमुचा परामृश करीत जाणें प्रांतीचें वर्तमान तरी परस्परे तुह्मी ऐकिलें च आसेल तें खरें आह्मी पत्रप्रयुक्ती ल्याहावें ऐसें उरलें नाहीं यामध्यें काये आसेल तें समजोन घ्यावें आह्मास या प्रांतिं राहों न द्यावें ऐसें आहें वरकड वर्तमान कृष्णाजी गो

---

१ येथून अक्षर निराळें.

सांगतां श्रुत होईल हे वीनति समस्ती नमस्कार कृपा आसो दीजे ॥
हे वीनति॥[1]

---

लेखांक ४६३ ] १६७१ पूर्व [ **अस्सल-बाळबोध**

श्रीरामवरद ॥

मोक्षश्रीया आळंकृत ॥ ऐसे हे संत श्रीमंत ॥ जीव दरिद्रि आसंख्यात नृपति केले ॥ १ ॥ बंधुवर्ग मुद्गलबावा यांप्रति रघुनाथनाम्नेन नमस्कार विज्ञापना ऐसी जे वैशाख शुध सप्तमी गुरुवासरपर्यंत स्वस्थळि श्री दयेनें सुखरूप आसों यानंतर भेटिचा हेत बहुत दिवस धरिला आहे परंतु प्रारब्धयोगें आंतर पडत गेला त्या गुणदोशाचा आरोप कोणावरि आहे ऐसें नाहिं परंतु बुधी येत्न ईश्वरसंकल्प आहे ह्मणोनि सुचना लिहिलि किं देहाचा भरवसा वाटत नाहिं कोण समयो[2] कैसा आहे कळत नाहीं ह्मणोंनि आत्मसंमंधासि आंतर नसावें ऐसें वाटतें ये गोष्टिची खंति बहुत आवस्था लागली आहे त्यासी मनें मन साक्ष आसेल[3] पुर्वी दोनि च्यार वेळा उपक्रम केला होता परंतु कितेकांच्या बुधीनें घडोन आलें नाहि आता सेवटली पाळि गोड करून जावें ऐसें आहे कितेकांचा आंतरभाव ऐसा आसेल की स्वार्थमुळें सख्य करितातीं ऐसें ह्मणतिल तरि जगदिशाचे कृपेचा स्वार्थ आहें वरकड स्वार्थ काहिं धरिला नाहिं श्री चें वरद सुकृत पुर्ण आहे कळलें पाहिजे संशयाचि वार्ता चीतांत आणुं नये सर्वज्ञासी बहुत काये लीहिणें समर्थ बुधी देईल तैसी वर्तणुक करणें आपुला आंतरहेतु तुह्मापुढे ठेविला योग्य दिसेल तें करणें लोभ आसो देणें हे विज्ञापना ॥

---

१ पत्र संपल्यावर मध्यें अंतर सोडून पत्राच्या अगदीं तळाशीं ' हे वीनंति ' आहे. २ कोण समयो येईल कैसा । याचा न कळे कि भर्वसा ॥ ३-१०-३९ ३ " मने मन साक्ष असेल " श्रीसमर्थांचें पत्र-भाग नववा-लेखांक पहिला. ४ श्रीसमर्थांच्या त्या पत्रांतील भाव या पत्रांत खरा च उतरला आहे व कांहीं शब्द हि जसेच्या तसे आले आहेत.

लेखांक ४६४ ] १६७१ ज्येष्ठ [ अस्सल-बाळबोध

श्रीराम

स्वामी

अध्यक्षपदीं नीरत स्फुटी ज्याची । सूडसू बोलती सत्य प्राप्ती ज्याची ॥ सार्पे दीसती सद्गुण साविया हो ॥ चैतंन्य वीग्रही श्रीमंत पाहा[1]हो ॥ १ ॥

या वीराजमान राजश्री भीउबा व राजश्री रामबा[2] यासी प्रती स्नेहाभीलासी तूकाबा[2] नांम्ने नमस्कार आपण पत्र पाठवीलें तें पावलें श्री[3] देहयात्राविध संपादुनी स्वधामवासी जाले हे अैकतां जे आवस्था अंतरीं संक्रमली ते श्री च साक्ष असे पत्री काय ल्याहावें आपल्या पत्रा आगोघर येक दीस डोमगावीचे दोघ ग्रहस्त पूणीयास गेले त्यानी सांगीतलें आतां आपण येतो परंतू शरीरास सावकाश वैशाख वद्य येकादशीपासून वाटत नाही घोडीयावर बसवेना यामूळें अंतराय आला हें आसेल्य तरी श्रीच्या पायाच्या शफत आसे सर्व साक्षी तो आहे चीत यावया उद्वीग्न परंतू शरीर कर्मयोगें न चालीलें मन तेथें आलें यास उपाय नाही सावकाश वाटलीयां येउ तूह्मी उभयाता सूज्ञ तेथें काय आनूवादावें समर्थ जैसी माया करीत होते तैसी च आपण ही करावी त्याचें पूंण्य समर्थ आहे आपण चींता न करावी सगुणदर्शन मात्र नाही परंतू ते जवळी व्यापकरूप आहेत वीशेष काय लीहीणें उदा[4]वादा हे वीनती

---

१ ही ओवी कुठली आहे, कळत नाहीं. तीतील कांहीं शब्द हि लागत नाहींत. २ भिवाजी बावा दादा व रामाजी असे दोघे मुद्गलांचे शिष्य होते व तुकावा हे हि शिष्य दिसतात पण त्यांचें नांव आजपर्यंत कोठें आलेलें नव्हतें. डोमगांवाहून पुण्यास जातांना वाटेंत कोठें तरी त्यांचा मठ असावा असें दिसतें. ३ मुद्गलस्वामी. यांची पुण्यतिथि १६७१ ज्येष्ठ शुद्ध १४. ४ हा हि शब्द लागत नाहीं.

लेखांक ४६५ ] १६७२ वैशाख वद्य १३ [ अस्सल-मोडी

श्रीसांब

रामदासी

६) मा। अनाम देशमुख व देशपांडिये पा। हवेली परंडे यासी रघोजी भोसले सेनासाहेब सुभा

० श्री
श्री शाहुरा
जपदांभोजभ्र
मरायित + + +
बिंबात्मजस्य मु
द्रेयं राघवस्य
विराजते

सु॥ खमसैन मया व आलफ मौजे डोमगाव व मौजे गउंढरे पा। मजकूर हे गाव स्वामीचे आहेत त्यास पा। मजकूरचा घासदाणीयाची खडणी सदरहु गाव वजा करून केली आसे तरी मौजे मजकुरास घासदाणीयाविसी मुजाहीम[1] न होणे ताकीद आसे जाणीजे छ २६ जमादिलाखर मोर्तबसुद

मोर्तब
सुद

रघोजी भोसल्यांचा शिक्का पूर्वी पाहण्यात नव्हता. शिक्क्यांतील तीन अक्षरें लागलीं नाहींत, तीं "चेतसः" असावीत. श्रीसंप्रदायासंबंधानें रघोजी भोसल्यांचें हें पहिलें च पत्र उपलब्ध होत आहे.

---

लेखांक ४६६ ] १६७६ [अनिश्चित -मोडी

श्री

मा। रा। कल्याणस्वामी

समर्थ माहाराज

विनती देवजी लखमाजी पा। मो। वेंकाजी व सखोजी कुलकर्णी समस्त दाही जण मोजे घारगाव यासि गंगाजी वासदेव देशमुख मामले परंडा सन हजार ११६४ त्याहवया कारणे ऐसे मोजे मा।रि आपला इनाम आदचावर चालतो त्यापैकी आपण आपले संतोशें श्रीमंत माहाराज

---

१ मुजाहीम=विरुद्ध, विरोध किंवा अडथळा करणारा.

राजेश्री श्वामी मठ मौजे डोबगाव यासि पचेतालीस बिघे आपण दिधला तर तुह्मी आपले सेत इनाम पैकी पंचेतालीस बिघे दाखऊन दीजे श्रीमंत आपले लावतील बाकी आपला इनाम बिघे १५ आपण आपला लाउ पंचेतालीस बिघ्यास मुजाहीम न दणें आपण आपले इमानपूर्वक इनाम दिधला तुह्मी चालवणे आपण लेकराचे लेकरी इनाम चालउ तुह्मी मारनुलेसी रुजु होऊन इनाम चालवणे साल बसाल चिठीचा उजूर न करणे लेकराचे लेकरी इनाम चालवणे जालीस येउ न दीजे जाणीजे छ ३ रावल[2] हे विनती ता। नकल घेऊन असल चिठी श्रीमंत श्वामी पासी भोगवट्यास दीजे

---

**लेखांक ४६७ ]** १६८४ माघ शुद्ध १२ **[ अस्सल-मोडी**

श्री

मोकदम मौजे रोहसे प्रा। हवेली मामले पराडें यासी आज्ञा केली ऐसी जे हरिभक्तपरायेण राजश्री भिवाजी गोसावी सांप्रदाये श्रीसंस्थान डोंबगांव याणी हुजुर शाहुनगर नजिक किले सातारा येथील मुकामी स्वामीसनीध येऊन विनंती केली कीं संस्थानाकडे श्री च्या उत्सहास पूर्वीपासून मौजे मजकूर स्वराज्य तर्फेने मोकासा व बाबती सावोत्रा निम चौथाई देखील सरदेशमुखी इनाम आहे आपण अनभवीत आहों त्याप्रमाणे भोगवटीयास स्वामींनी कृपाळु होऊन इनामपत्रें करून घ्यावी त्यावरून मनास आणून सुदामत चालत आल्या प्रमाणे मौजे मजकूर मुकासा व बाबती व सावोत्रा व निम चौथाई देखील सरदेसमुखी इनाम करून दिल्हा असे तरी तुह्मी सदरहू प्रमाणे मौजे मजकूर यांस व यांचे शिष्यपरंपरा इनाम चालवणे प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करिता या पत्राची प्रती लेहून घेऊन हे असल पत्र भोगवटीयास गोसावीयाजवल परतोन देणे जाणीजे छ ११ रजब सुहुर सन सलास सीतैन मया व अलफ चोलवणे ७

---

१ " र " खोडून " ज " केला आहे. २ अक्षर निराळें.

**लेखांक ४६८ ]** १६८७ श्रावण वद्य १४ **[ अस्सल-मोडी**

श्रीमार्तंड प्रां

तां मोकदमानीं मौजे कुरोली खुर्द प्रा फलटण सुहुर सन११७५ बि-दानद कीं राजेश्री भिवाजी बावा डोंबगांवकर यांसी जमीन चावर ·॥. अटाली[1] सभाजी अहेरकरा[2] बा देविली असे तरी जमीन मेजोन यांवरी घालणें तेथील उपेद्र[3] होईल ते अनुभऊन आह्मांते कल्याण इछून सुख-रूप राहातील जाणिजे छ २७ माहे सफर




बार सुद

या व पुढील पत्राचे अक्षर एका च कारकुनाच्या हातचें आहे.

**लेखांक ४६९ ]** १६८७ भाद्रपद शु. ८ **[ अस्सल-मोडी**

श्रीमार्तंड प्रां

हारिगुरुभग्तीपरायेण राजेश्री भिवांजीबावा गोसावी वास्तव्य मठ मौजे डोंबगाव स्वामीचे सेवेसी

सेवक मुधोजी नाईक निंबालकर दंडवत विनंती उपरी सुा सन ११७५ कारणे पत्र तुह्मांस लेहून दिल्हे जे मौजे कुरोली खुर्द येथे सेत जमीन चावर ·॥· अटाली दिल्ही असे तर सदरहु जमीन कीस्त-कौर[4] करून तेथील उपेद्र जो होईल तो अनुभऊन आह्मांस आसीर-वाद[5] देऊन सुखरूप असणें कललें पाहिजे बहुत काय लिहिणे जाणिजे छ ७ माहे राबिलावल भाद्रपद शुध अष्टमी रविवार




---

१ या शब्दाचा अर्थ कळत नाहीं. २ " सभाजी अहेरकरा " हे शब्द बरोबर लागले आहेत, अशी खात्री वाटत नाहीं. ३ " उपेद्र " च आहे. अर्थ ' उत्पन्न ' असा दिसतो. ४ किस्तगारी=लागवड. ५ येथून शेवटपर्यंत अक्षर निराळें असून फार सफाईदार आहे. तें मुधोजी नाइकांचें असावें, असें वाटतें. कौतुकास्पद आहे·

लेखांक ४७० ] १६८७ पौष शुद्ध ९ [ अस्सल-मोडी

श्रीशंकर

श्रीहरिभक्तपरायेण राजमान्य राजश्री रामचंद्र गोसांवी स्वामीचे शेवेसी

सेवक गोविंदराम सां नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित असिले पा विशेष आपण पत्र पा ते पावले लिहिला मजकूर कलो आला जे सांगणे ते सुलतानजीकडेस सागितले आहे गांवकरी ही येथ आले आहेत त्यास आज्ञा करणे ती करू प्रस्तुत थोडके बहुत काम करून देउ बहुतं[1] काय लिहिणे हे विनती

पैवस्ती सन ११७५ छ १७ माहे रजब पौश शुध ९

[ या पत्राचा फारसा बोध होत नाहीं. गोविंदराम ह्मणजे पुढील लेखांक ४७३ तील सुभेदार की काय न कळे.

---

लेखांक ४७१ ] १६८९ भाद्रपद वद्य १० [ अस्सल मोडी

श्री



स्वति श्री नृपशालिवान शके १६८९ सर्वजीतनाम सवत्सरे भाद्रपदवद्ये १० गुरुवासरे तदिनीं राजश्री भिवाजीबावा गोसावी रामदासी संस्थान मौजे डोबगाव प्रा परंड हवेली यासी प्रति राजश्री नागोजी बीन बावाजी जुझारराव घांटगे दंडवत सुहुर सन समान सातैन मया अलफ सन ११७७ लेहून दिल्हे दानपत्र ऐसे जे स्वामीचे समाधीपासी संस्थान बेजमी बदल मौजे निढुल का मलेवाडी येथील शेरा पैकी जमीन बिघे ·। तीस जिराईत दिल्हे अस तेथील उंपइद्र[3] संस्थानास नेऊन सदव्ये करून आमचे

---

१ येथून अक्षर निराळें. २ शिक्का शाईनें भरून गेला आहे, त्यामुळें लावण्यास मार्ग राहिला नाहीं. शिक्यांतील मजकूर फारशी असावा, असें वाटतें. ३ मागील लेकांक ४६८ व ४६९ यांतील उपेंद्र.

अभीष्ट चितोन वंशेपरंपरा सदरहु जमीनीचा भोगवटा अनभऊन असावे हे दानपत्र लिहून दिल्हे सही परवानगी हुजूर छ २३ रबिलाखर सही[1]




रुजु सुरु सुद

बार

| निंबाळकर, घाटगे, भोसले वगैरेंचा डोमगांव मठाशीं फार संबंध होता असें या व इतर कांहीं लेखांकांवरून स्पष्ट होत आहे.

---

**लेखांक ४७२ ]** १६९० ज्येष्ठ व १३. **[ अस्सल-मोडी**

श्री

भीवाजी गोसांवी




तां। **जानोजी** पा। मों मौजे सलगाव प्रा। हवेली सु। सन ११७८ अंकी मौजे मजकुरी इनाम सेत ·॥· अदचावर माहाराज डोमगावकर यासि आहे तर सुदामत प्रमाणें पेशजी चालत आला त्याप्रा। पुढे ही चालों देणे कोन्हे गोष्टीचा हीला हारकत[3] न करणे जाणिजे छ २७ मोहरम

---

**लेखांक ४७३ ]** १६९२ **[ अस्सल-मोडी**

श्री

राजश्री राव रभाजी बाजी जयेवंत निंबालकर गोसावी यासी

ऽ॥ श्रीमत सकल गुण अलकर्णी अखंडित लक्ष्मी अलंकृत राज-

---

१ " सही " एवढीं दोन च अक्षरें निराळ्या हातचीं दिसतात. २ सुदामत=चालत आल्या प्रमाणें, सुखानें, हरकतीवांचून. ३ बिलाकुसूर, निःसंदेह

मान्ये श्री॥ गोविंदराव श्रीनिवास सुभेदार सरकार परंड आसिर्वाद विनती उपर येथील कुशळ जाणौन स्वकीये कुशळ लेखन करीत असीले पाहिजे विशष हरीभक्तपरायेण राजश्री भिवाजी बावा गोसावी स्वस्थान डोमगांव याजकडे मौजे बारलोणी व मौजे गउंडर देहे दोन येथील मोकासा व बाबती व घासदाणा दजूर चौथाई सावोत्रा व सरदेशमुखी देखील इनांम असे स्वराज्यातून दोन्ही गाव वजा असंत तर मौजे मारचा अकार बमोब चौथाईचा वसुल बावाकडे देवित जाणे बहुत काये लिहिणे रा॥ छ ७ माहे मोहरम सन ११८० हे विनती

मोर्तब
सुद

श्री पांडुरंग
चेरणी तत्पर श्री
नीवाससुत गो
विंदराव नीरंतर

---

लेखांक ४७४ ] १६९७ [ अस्सल-मोडी

श्री

श्रीगुरुभक्तपरायेणं राजश्री
रामाजी बावा स्वामीस

आज्ञाधारक तुळाजी पा॥ मौजे वणे दडवत विनती उपरी विशेप मानाजी नाईक जाचंक याजबबा॥ रु॥ ३२ पाठविले ते घेणें आणी मानाजी नाईक याचे नावे फारखत देण व कतबा[2] रु॥ ६४ चौसष्टीचा देण नाइकु गुरव पा॥ आहे रु॥ घेऊन कतबा व फारकत देण आनमान सहसा न करणे कळले पाहिजे स्वामीप्रती विशेष काये लिहिणे हे विनती मी च येता परतु गावात काम निकडीचे लागले याजमुळे न आलो तर लिहिल्याप्रा॥ कार्य विले लावणे कळले पाहिजे हे विनती

---

१ हा शब्द खात्रीपूर्वक लागत नाहीं. २ कतबा=ऋणपत्रक, कर्जरोखा.

लेखांक ४७५ ] १६९७ पूर्व [ अस्सल-मोडी

श्रीमार्तंडप्रसन

तीर्थस्वरूप राजश्री रामाजीबावा वडिलाचे सेवेसी
आपत्य जिवाजी त्रिंबक व माणको त्रिंबक रेवडिकर सां नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लेखन आज्ञा करीत असिले पाहिजे विशष आपण जमिनीविसी सरकारची पत्रे येथील कारभारीयास पाठविली आह्मास लिहिले उतम आहे ह्या कार्यास आह्मी चुकावे ऐसे नाही आपण पुर्वी च आज्ञा केली आहे हाली पत्रे पाठविली फार च उतम आहे परतु काली येथून कारभारी पुणीयास गेले बा आह्मी हि गेलो पधरा दिवसी येतील तदनतर फड घालून कार्य केले जाईल स्वामीचे आज्ञेसिवाय नाही बहुत[1] काये लिहिणे कृपा लोभ केला पाहिजे हे विनंती

---

लेखांक ४७६ ] १७०५ पूर्व [ नकल-बाळबोध

श्रीराम

श्रीरामदासस्वामी

श्रीगुरुभजनपरायण राजेश्री तुकोबा बावा याप्रति लक्ष्मणनाम्ना आनेक आसीर्वाद उपरि येथील कुषल ता फालगुण वद्य नवमीपर्यंत येथास्थित आसें यानंतरें येथिल उछाहास आपण यावे व राजेश्री भिवाजिगोसांवी यानी हि यावे ये विपइंचा आर्थ तिकडिल व इकडिल सर्व हि भेटिसमइ परस्परें श्रुत जाला च आहे त्यावरुन डोमगावांस येथुन पाठवावया करीता आपणाकडेस पत्र पाठविलें आहे तर तें त्याकडे पाठउन आपण हि आपूलें पत्र विस्तारे लेहुन ते व आपण आगत्यरुप यावें दिवस केवळ च समीप आले ह्मणुन आनुमान न करावा प्रतिपदेस यावे तें पंचमीच येणे होइल इतुक्याकरितां आनमान[2] करावा आगोधर सुचना करावी तरी दंगा चोहुकडे होता प्रस्तुत राजेश्री रघु-

---

१ येथून अक्षर निराळें. २ हस्तदोषानें मधला " न " गळाला असावा.

नाथपंत दादा हि पुणीयास गेले श्रीमंताच्या फौजा तिकडे च आहेत प्रस्तुत हा प्रांत आहे तसा च आहे याजकरि[1] पत्रे पाठवीलि कळलें पाहिजे बहुत काय लिहिणे हे आसिर्वाद देशकाळ वर्तमान येथास्थित सुखरुप आहे तरि मागुति पुढें हि यात्रेस येणे होई च परंतु येदा आनमान न करावा हे आसिर्वाद

चाफळमठपति लक्ष्मणस्वामी यांचें हें पत्र दिसतें. तुकोबा मुद्गलांचे शिष्य असावेत. रघुनाथपंत दादांचें पुण्यास असणें व श्रीमंतांच्या फौजांचें तिकडेस च असणें यावरून या पत्राचा नक्की शक पुढें मागें ठरवितां येईल.

---

**लेखांक ४७७**] १७०७ मार्गशीर्ष शुद्ध १५ [**अस्सल बाळबोध**

॥ श्री कृष्णा ककुत्मति ॥

श्रीगुरुभक्तपरायण राजमान्य राजेश्री भीवाजि गोसावि संस्थान डोबगाव यासि

प्रति समस्त ब्राह्मण क्षेत्र कऱ्हाड नमस्कार विनंति उपर वडगावि मठ तुमचा अहे तेथिल अधिकार रघुनाथ गोसावियासि तुह्मि दिल्हा परंतु त्याने अपुले भाउ कुरलेकर मठात अणोन ठेविले होते त्यानि सर्वश्वे अपहार करोन अल्या ब्राह्मणास व अतित अभ्यागतास अन्न मिळेना सारिखे केले त्यावरोन आह्मि समस्तानि धर्म चालावा याकरितां रघुनाथाचा शिष्य कृष्णाजि गोसावि निस्प्रहि अहे त्याचे स्वाधिन मठचा कारभार करावा ऐसा निश्चय करोन हें पत्र अपणास लिहिले असे तरि तुह्मि अपणाकडिल येकजण गोसावि पाठउन देणे त्याचे हातोन लिहिलेप्रमाणे मठचा बंदोबस्त करावा पौष्य शुध द्वादसिस जनार्दन गोसावियाचि पुण्यतिथ अहे त्याचे साहित्य जाले पाहिजे याकरिता तुह्मि अपणाकडिल गोसावि पत्रअलोकानि सत्वर रवाना करावा बहुत काय लिहिणे हे विनंति ॥

सके[3] १७०७ मार्गेश्वर शुध १५

---

१ "तां" गळाला असावा. २ "ल" गळाला असावा. ३ येथून मोडींत.

लेखांक ४७८ ] १७०७ [ नक्कल-बाळबोध

श्री

हरिगुरुभक्तपरायण राजमान्य राजेश्री भिवाजीबावा
मठ डोंबगाव

यांप्रति समस्त ब्राह्मण कऱ्हाडकर नमस्कार विनंती उपरि तुह्मास येक दोन पत्रे वडगांवच्या मठाकरिता पाठविलि होती त्याचे उत्तर आले की येतो ह्मणुन लिहिले परंतु अपले येणे घडले नाही रघुनाथ गोसावी व कृष्णाजी गोसा(वी) पुण्याहून अपल्याकडेस आले होते समयी अपण समजाविशी केली कारकून पाठउन दिला होता आणि गावाची सोडचिठीविषी पत्रे लिहिली ती तुह्मी कारकूनाचे स्वाधीन करावी ती तुह्मी रघुनाथगोसावी याचे स्वाधीन केली त्या पत्रावरून ऐवज घेउन गेला पुढे रामनवमीचे उत्साहास ऐवज नाही ते समयी लोकाचे कर्ज काढु(न) उत्साह केला तुमच्या पत्राने गाव सरकारात गुंतला सरकारचें ह्मण(णें) आहे कीं डोंबगा⁻कर आल्याशिवाय अह्मी गाव देत नाही ते आले मणजे गाव त्याचे स्वाधीन करू ऐसे त्याचे ह्मण(णें) आहे त्यास वडगावचा मठ डोंबगांवकर यचा प्रख्यात अहे त्यास तुह्मी आल्याशिवाय मठचा बंदोबस्त होत नाही कळले पाहिजे तुह्मी येक वेळ यावे बहुत काय लिहिणे हे नमस्कार ॥

---

लेखांक ४७९ ] १७०८ माघ वद्य ९ [ अस्सल-मोडी

श्री

श्रीकल्यानस्वामी

दानपत्र सके १७०८ पराभवनामसवतछरे माघ वदे ९ नवमी ते दिवसी माहाराजे राजेश्री भीमाजीबावा स्वामी गोसावी यास

सुलतानजी पा। मोकदम व समस्त दाहीजन मौजे कुभेज प्रा। हवेली मो। परंडा सुा। सन ११९६ कारने दानपत्र लेहून दिल्हा ऐसे जे मौजे-

मजकुरी सेत जमीन ८१५ बीघे पंधरा मीरास खुज्याबाबत हे तुह्मास श्री च्य नवेद्यास व नंदादीपास दीलहा हे आपन व आपले सीपपरपरेन जमीन अनंभउन घ्यावी अह्मी अपले वैशपरमपरन चालउ यास अंतर करनार नाही पटी वगैर खर्च तुह्मावर घालनार नाही अपन पासर सोसू हे इनामपुरवक लेहून दिल्हा सही छ २२ माहे राखर

नीा नागर

बीा सदाशीव नरसींव्ह कुलकर्णी मौजे मार

साक्षे भीवराव व बाबाजी देशमुख मामले परडा

ताजाकलम सदरहु सेतच्या घुगऱ्या पाटील कुलकर्णी याच्या सोडल्या असेत हे इमानपूर्वक सही

या पत्रास साक्ष

| | बलुत |
|---|---|
| १ रघोजी पाटील कोकाटे | १ भीकाजी सुतार |
| १ संताजी ताबे | १ नीबा लव्हार |
| १ येसाजी पक्षे | १ थोराजी परीट |
| १ जोती पोवार | १ नीबा नाहावी |
| १ तुळसी कोरडे | १ सेटी चाभार |
| १ नहानाजी धर्व | १ सुलतानखान मुलाना |
| १ ह्मातारजी काले मौजे मार | १ मल्हारी सोनार |

माहार

१ सेटी वाा ह्मातारा माहार

१ याद्या वाा यसा माग

लेखांक ४८० ] १६७१-१७१० [ अस्सल-मोडी

श्रीराम

यादी राजेश्री भिमार्जी गोसावी संस्थान मौजे डोबगाव कैलासवासी सौभाग्यवती सखवारबाईसाहेब याचे गुरु बावा यास पावत होते रुपये

१२०० वर्षासन पालखी सुधा
३२० तादुल पुण्यतिथीस सोळुले मापें खंडी
२ येकूण सन तिसापासून
२५ दसरा नवरात्र
१०० संवछर प्रतिपदा सन तिसापासून
७२० गुरुबंधु रामाजी गोसावी सालिना करार सन तिसापासून

२३६५

पोशाक
१ दसरा
१ सवछरप्रतिपदा

२

येणे प्रमाणें सरकारातून पावत होते

लेखांक ४८१ ] १७१० पूर्व [ अस्सल-बाळबोध

श्री

देवमान्य राजेश्री गणेशबावा यांप्रती रघुनाथानें साष्टांग नमस्कार उप-(री) तुह्मी सागुन पाठवीलें कीं अपली जपमाळा मठांत आहे ते जतन करणें तर तुह्मी मठास यतापेंत आह्मी तुमची जपमाळा जतण करीतों मग तुह्मी आलीयावरी तुह्मी अपुली माळा तोडा आथवा ठेवा आणीक वर्तमान तुह्मी साजीयां ते प्रसंगी असतां रामागोसावीयानें मलारगोसावीयास दगा दीला तो तुह्मी संपादुन लग्नाचे नीमीतें करून

डोमगावास चुकाउन गेलांत हे काही तुह्मा योग्य नव्हे मलारीस फार श्रम जाले ढाळ घेतो मुखजबानी जीवाजी बाबा सागता कळो येईल तर तुह्मी माहापुरुश होता ना ऐसे जीवघात न करावे तर बरें थोर आहात तर आतां देखतपत्र लवकर येणें हे वीनती

---

लेखांक ४८२ ] १७१० पूर्व [ अस्सल-बाळबोध

श्रीरामकर्ता ॥

परोपकाराचीया रासी उदंड घडति जयासी ॥
तयाच्या गुणामहत्वासी तुळणा कैंची ॥ १ ॥

पुण्यश्रीया वीराजीत राजेश्री मल्लारपंत यांप्रति परमश्नेहपुर्वक रघुनाथ-नामने आसीर्वाद उपरी आपला श्नेह पुर्वापर होता तो या चीतास ठाउका आहे आणी या गोसावीयांच्या कजीया नीमीत्य अंतराय केला तरी आपण सत्याभीमानी आहेत जो धर्म न्याय असेल तो वीलेस लावणें त्याचा आमचा कजीया तुटला नाही हे वर्तमान आबांस लिहीलें आहे तें मनास आणुन उतर देणें दुराभीमानात न पडणे बहुत काये लीहीणें हा आसीर्वाद

---

लेखांक ४८३ ] १७१० [ अस्सल-बाळबोध

श्रीराम ॥

निष्ठावंताचे मंडण । वीमळ जयाचें अंतःकर्ण ॥
सद्गुरुभजनसीळ पुर्ण । परम श्नेहाळु ॥ १ ॥

मोक्षश्रीया वीराजीत राजेश्री हरिबावा यांप्रति पुर्णपुर्व श्नेहाधिकारियां रघुनाथनामने नमस्कार उपरि आमचे वर्तमान श्री देविच्या दर्शनासी आलों उपरि यात्रा सांग करून माणकेश्वरासी आलो आसों सोमवारिं निघावें यथुन ऐसा नीश्चये आहे त्यासी आपलि भेटि व्हावी ऐसा चींतातील परम हेत आहे पुर्व वीचार चीति धरून आगत्य आगत्य यथवरि आलें पाहीजे सर्वज्ञास बहुत काये लिहीणें हे सुचना ॥

---

लेखांक ४८४ ] १७१० पूर्व [ अस्सल-मोडी

श्री

राजश्रीया वीराजीत राजमान्य राजश्री आपाजीपंत
स्वामीचे शेवेसी

पो गोविंदराव भगवंत सां नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष हरीभक्तपरायण भीवाजी गोसावी संस्थान डोंबगांव हवेली पराडे यांजकडे संस्थानास मौजे बारलोणी व गौडरे व रोसे व मौजे डोबगांव चौहो गांवचा दरोबस्त स्वराज्याचा आमल जकात सुधां आहे तुह्मी आमलास खलेल करितां ह्मणौन कलले त्यावरून लिहिले आहे तरी राजपत्री पेशजीपासून सुदामत आमल संस्थानाकडे चालत आले असतील त्याप्रमाणे चालवावे नवीन दीमत न करावी नवीन दीकत करावयास कारण नाही पुन्हा याविशी बोभाट न यावा रा छ २९ माहे जिल्हेज बहुत काये लिहीणे लोभ कीजे हे विनंती

---

लेखांक ४८५ ] १७१० पूर्व [ अस्सल-मोडी

श्रीशंकर

राजश्री माहादाजीपंत ठाणें कसबे तेर गोसावी यासी

ऽ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो राजाधिराज राजे हैबतराउ निंबालकर बाहादर दंडवत उपरी हरीभक्तपरायेण राजश्री भीवाजीबावा गोसावी डोबगाउकर याचा इनाम कसबे मजकुरी जमीन चावर १ येक बहुत दिवस चालत आला आहे त्या प्रा श्रीचे उछावास्तव सरकारातून चावर १ येक देविला आहे तरी तुह्मी



इनामाविशई त्याचा फिरोन बोभाट येउ न देणे जाणिजे छ ६२ जमादिलावल बहुत काय लिहिणे




---

* शिक्का अति अस्पष्ट उमटला आहे.

लेखांक ४८६ ] १७१० पूर्व [ अस्सल-मोडी

श्रीराम

हरीगुरुभक्तपरायेण राजमान्य राजश्री भीवाजी गोसांवी स्वामीचे सेवेसी

विद्यार्थी चिंतामणराउ सीवदेव व रायाजी केशव साष्टांग नमस्कार विनंती येथील क्षेम जाणोन स्वकीये लेखन करावया आज्ञा केली पाहिजे विशेष आपणाकडून बहुत दिवस पत्र येऊन कुशलार्थ कलो येत नाही तरी ऐसे नसावे सदैव पत्रद्वारे परामर्ष करीत असिले पाहिजे यानंतरी राजश्री रामचंद्र गोसावी यास आपण येथे ठेविले होते त्यावरून श्रीमंत मातुश्री स अर्ज करून मौजे बेलोडी ता। परडे येथील इनामपत्रे करून दिल्ही आहेत व देवडीची हि पत्रे करून दिल्ही आहेत स्वामीनी अनभऊन आह्मास आसीर्वाद द्यावा ह्मणजे आमचे कल्याण आहे बहुत काये लिहिणे हे विनति

लेखांक ४८७ ] १७१० पूर्वकालीन [ अस्सल-बाळबोध

श्रीरामसमर्थ

श्रीस्वामि वडिलांचे सेवेसी

सेवक भिमाजि गोसांवि कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपेरी अज्ञेप्रमाणें सत्तरुसीस च्यारी दीवस वाट पाहिली तों अज्ञा काहीं च न आली मग आपण मुख्य स्छळास आलों त्यास आपण श्री च्या दर्शना येतात कीं काय तें लीहीलें पाहिजे श्री स्वामि ही चांफाळास जातात व आपण ही जाउं कळलें पाहीजे विशेष ल्याहावें तरी स्वामि सुज्ञ आहेत लोभ असों दिल्हा पाहिजे हे विनंति

आपण येणार असीले तरी येक दोन दीवस राहों वीलंब असीला तरी उत्तर पाटविलें पाहीजे हे विनंति

लेखांक ४८८ ] १७१० पूर्व [ अस्सल–बाळबोध

श्री

श्रीगुरुभक्तपरायेण मोक्षश्रीया वीराजमान्य राजमान्य राजेश्री भीमाजी गोसावी यांप्रती

गणेश गोसावी व सीवराम गोसावी नमस्कार वीनंती उपर तुह्मी सर्वत्राच्या नावें पत्र पाठवीले ते पावलें ऐसीं च सर्वत्रांच्या नावे पत्रे पाठउन सर्वत्रांचा साभाळ केला पाहिजे आमचे दरबारि बहुनाईकीचा हिसोब नाहि आणी तुह्मी धरीता हे गोस्टी उत्तमात नाहि सर्वत्र गोसावी आमच्या वीचारावेगळे कोणी नाहित ऐसे पष्ट समजणे नीनाईकीची पत्रे लीहीत न जाणे ॥ यानतर माहाराज काकासाहेबाची मेहरबानी होती त्याप्रमाणे तुह्मी हि आसो देणे वडीलांचा परस्परे बंधुमर्यादा सेतु बाधला त्याप्रमाणे तुमचे आमचे वचन उलंघन न होय ते केलें पाहिजे यांत तुह्मी सर्वजण आसा कीतेक राजश्री देवकी समजून घेणे सुज्ञाप्रती सुचना करणे लागत नाहि परतु लीहिले आसे

---

लेखांक ४८९ ] १७१० उत्तर [ अस्सल–मोडी

श्री

तीर्थरूप राजश्री नाना व ता। राजश्री भाउ स्वामीचे सेवेसी

आपत्यें त्रीबक सदासीव कृतानेक सां। नमस्कार विनंती येथील कुशल ता। छ २७ सहुरपर्यंत स्वामीचे कृपेकरून येथास्तित असे विशेष राजश्री भीमाजी गोसावी संस्थान डोबगांव याचे वर्षासन हुजुरून थोरले देवढीकडून नक्त रुपये २८६५ अठावीसे पांसष्ट व पोपाख दोन येणं

---

१ मागील लेखांक ४८० पहा. तेथें २३६५ असतां येथें २८६५ अंकांत व अक्षरांत दिलेले आहे. आता त्यांतील थोडें च कांहीं मिळावयाचें आहे! तेव्हां कोणता हि अंक बरोबर किंवा चुकीचा असो. डोमगांवीं सकवारबाईचें गुरुगृह होतें एवढें च आज आपणांस महत्त्वाचें आहे.

प्रमाणे दफ्तरचे रुजुवातीने पावत होते त्यास सांप्रत आपण गोसावी-बावास वर्षासन रुपये पांचसे नेमिले त्याजवरून गोसावीबावा यांचे शीष आह्माकडे आले त्याजवरून सेवेसी दफ्तरची यादी व गोसावी-बावाचे सीष आले आहेत यासीवाय मौजे बेलवडी हा गाव सौ बाई-साहेबी गुरुदक्षणेस उदक सोडले आहे वर्षासनचा व गांवचे करून देवणार स्वामी समर्थ आहेत हे संस्थान थोर व बाईचे गुरुकुल आहेत स्वामी जाणतात च हे विज्ञापना

---

**लेखांक ४९०** ] १७१० उत्तर [ **अस्सल-बाळबोध**

श्री

श्रीहरिभक्तीपरायेण वीराजमान देवमान्य व बहुमान्य
राजश्री जनार्दनबावा स्वामी वडीलांचे सेवेसी

सेवक चरण आंबाजी पाटील व नरसोजी पा। चरणावरी मस्तक ठेउन सां दंडवत वीनंति उपरी स्वामी गावांस येउन मांडव घालुन मोहत्छाव करणार ह्मणुन हुजुर वीदीत जालें त्यास आह्मि गावी नसता तुह्मी गावांत येउन मोहत्छाव करावा असे नाही पुर्वीपासून श्री चा उत्छाह चाफळी करीत असता आणी प्रस्तुत माजगावी करीता हें उतम नव्हे ये गोष्टीचा प्रसंग हुजुर बोभाट जाला ईतके गांवकर करी-तात गोसावी यास सामील जाले ह्मणोन बोभाट जाला आह्मी तो सततरुसीस दीवाणकार्यास आलो लटका च बोभाट काये नीमित्य अमचा केला या उपरी स्वामीनी दया करून पुर्वापार उछाह करीता तेथें जाउन करावा आमचे गावीं करावयास समंध नाही सेवेसी वीनंती जे माहा-त्छळि उत्छाह करणे हे योग्य आहे आमचे गावीं न करणें बहुत काय लीहीणे हे विनति ॥

लेखांक ४९१ ] १७१३ कार्तिक शुद्ध ६ [ अस्सल-मोडी

श्रीशंकर



अजस्वारी राजश्री भिवराव माणकेश्वर सुभेदार सरकार परंडा ता। मो।
देहाये प्रा। हावेली सुहूर सन ११९२ देहाये मा।र पो। दरबस्त चौथाई
हरिभक्तपरायेणे राजश्री भिमाजी बावा गोसावी संस्थान डोंबगांव याज-
कडे देहाये मा।र पैकी

१ मौजे डोबगाव — १ मौजे रोहसे

१ मौजे गोडरे — १ मौजे बारलोणी

२ — २

येकूण देह च्यार येथील सरदेसमुखी व मोकासा व बाबती व घास-
दाणा व हुजूर चौथाई व सावोत्रा राजपत्री पेशजीपासून आहे त्याप्र-
माणे करार असे देहाये मा।र आमल कचा आकारा प्रा। वसूल सुरलीत
देणे स्वामीकडे प्रविष्ट करणे जाणीजे छ ४ माहे रावल



लेखांक ४९२ ] १७१७ ज्येष्ठ शुद्ध १५ [ अस्सल-मोडी

कल्याण–मुधोवा–भिमाजी–महारुद्र अशी डोमगांवची शिष्यपरंपरा.
कल्याणांचे धाकटे बंधु दत्तात्रय हे शिरगांवीं असत, त्यांची वंश-
परंपरा अशीः दत्तात्रयांचे पुत्र राघव, राघवांचे यशवंत व अनंत,
यशवंतांचे लक्ष्मण, भीम व मनोहर.
डोमगांव व गोंडरें येथील उत्पन्नासंबंधानें पूर्वी राघव व मुधोवा
यांच्यांत वाद झाला होता च, त्याचा निकाल समर्थांचे नातु
गंगाधरस्वामी यांच्या विचारें होऊन हें उत्पन्न मुधोवाकडे शिष्य-
परंपरा लागलें होतें. तरी पुन्हा तो च वाद अनंत राघव व

* शिक्का व मोर्तब शाईनें इतके भरलेले आहेत कीं ते लागत नाहींत.

लक्ष्मण यशवंत यांनीं सुरू करून मुधोबांनीं द्रव्यबळावर पूर्वींचा निवाडा मिळविला, आमचे कागदपत्र डोमगांवमठांत च राहिले इत्यादि तोंडी तक्रारी केल्या पण त्या मुळीं च शाबीत झाल्या नाहींत. तेव्हां महारुद्रांचा दस्तऐवजी पुरावा, पूर्वींचा निवाडा व वहिवाट हीं पाहून श्रीमंतांनीं वादाचा निकाल महारुद्रांच्या तर्फे केला, तो हा निवाडा होय. त्यांत कांहीं अवांतर हि माहिती आहे. निवाडा वाचण्यासारखा आहे.

श्री

० श्री
राजाशाहुनर
पतीहर्षनिधा
नमाधवरावना
रायणमुख्य
प्रधान

मा। अनाम देशमुख व देशपांडे ता। हवेली परांडे सरकार मजकूर यांस माधवराव नारायण प्रधान सु॥ खमस तिसैन मया व अलफ शके १७१७राक्षसनाम संवत्सरे हरिभक्तपरायण राजश्री माहारुद्र भिमाजी गोसावी संप्रदायेश्रीरामदासस्वामी संस्थान डोमगांव यांजवर लक्ष्मण गोसांवी बीन येशवंतगोसांवी व अनंतगोसांवी बीन राघवगोसांवी रामदासी मठ सिरगांव प्रांत कराड हे संस्थान मजकूरचे अधिकारा विषई सरकारांत फीर्याद आले त्याजवरून माहारुद्रगोसांवी यांस बोलाऊन आणून उभयतांच्या तकरीरा व पुरसीसांचीं उतरें लेहून घेतली त्यांस माहारुद्र गोसांवी यांचे तकरीरेंतील अन्वये कीं श्रीरामदासस्वामी संस्थान किले सज्यनगड यांचे सीष्य कल्याणगोसांवी ब्रह्मच्यारी होते त्यांचे धाकटे बंधु दत्तोबा गोसांवी ग्रहस्ताश्रमी होऊन सिरगांवी असत त्यास कल्याणगोसांवी यांचे सिष्य मुधोबागोसांवी त्यांचे सिष्य भिमाजी गोसांवी त्यांचे सिष्य आह्मी त्यास कल्याण गोसांवी यांचा काल परांड्यांत जाहाला ते वेलेस दत्तोबा गोसांवी किंवा त्यांचे पुत्र कोणी जवल नव्हते सार्थक मुधोबा गोसांवी याणीच करून त्यांच्या व मुख्य स्वामींच्या अस्ती महायात्रेस पाठविल्या आणि कल्याणगोसांवी यांची समाधी डोमगांवी बांधोन भजन पुजन करूं लागले स्वामीचे नातु गंगाधरगोसांवी यांस विनंति करून मौजे डोमगांव व गोंडरे ता। मजकूर या दोन्ही गांवचा ऐवज मठाचे बेगमीस लाऊन घेऊन राजपत्रें करून घेतली

त्यापासून आह्मी सिष्यपरंपरा चालऊन राज्याचें अभिष्ट चिंतन करून संस्थानचा अधिकार करीत आंहो ह्मणोन व लक्ष्मणगोसांवी यांचे तक्रीरेंतील मजकूर जे स्वामीचे सिष्य कल्याणगोसांवी त्यांचे धाकटे बंधु दत्तोबा गोसांवी त्यास कल्याणगोसांवी ब्रह्मच्यारी व दत्तोबागोसांवी ग्रहस्ताश्रमी होते स्वामीचा काल जाहाला ते वेळेस उतरक्रीया व पुण्यतीथ होऊन मानाचा विडा नारल दत्तात्रयेगोसांवी याणी घेतला कुटुंबाचा योगक्षेम चालावा ह्मणोन रामचंद्रपंत अमात्य गुरुभाऊ यांजकडे जाऊन ईनाम वगैरे संपादन करून सनदा घेऊन कल्याणगोसांवी यांजपुढें आणून ठेविल्या त्याजवर कल्याणगोसांवी यांचा काल जाहाला तेव्हां केशवगोसांवी डोमगांवी समाधीदर्शनास गेले तेथें मुधोबागोसांवी यांची वहिवाट पाहून गुरूचा वंश स्थापावा ह्मणोन कजीया करून राज्यद्वारीं गेले तेथें मुधोबागोसांवी याणी द्रव्याचे बळें काये केलें तें त्यांचे ते जाणत हाली माहारुद्रगोसांवी अधिकारी होऊन आह्मास मानीत नाह्री तेथें गेलो असतां राहूं देत नाहीं येविसीं वाजवी मनास आणून आमचा अधिकार आह्माकडे चालविला पाहिजे ह्मणोन याप्रमाणे उभयतांचे लिहिल्यावरून आपलाले साधनाचे कागदपत्र आणून दाखवणे ह्मणोन पुरसीस करितां आमचे कागदपत्र व वस्तवानी होती ते मठांत राहिली ते आमचे हातास लागत नाही मग आम्ही साधन कोठून दाखवावे म्हणोन लक्ष्मण गोसांवी याणीं पुरसीसीचें उतर लेहून दिल्हें तेव्हा माहारुद्रगोसांवी यांस पुरसीस केली कीं लक्ष्मणगोसांवी यांचे साधनाचे कागदपत्र व वस्तवानी मठांत राहिली आहे त्याचा झाडा कसा आहे तो आणून दाखवणे तेव्हां त्यांचा कागदपत्र व वस्तवानी मठांत नाही त्यांणी पुरवणी[1] करून दिल्ह्यास सरकारांतून आज्ञा होईल त्यास मान्य याप्रमाणे माहारुद्रगोसांवी यांचे बोलण्यावरून सदरहूची पुरवणी करून देणे म्हणोन लक्ष्मणगोसांवी यांस पुरसीस केली असतां

---

१ पुराव्यानें सिद्ध.

उत्तर न देत व माहारुद्र गोसांवी यांणी सिष्यपरंपरा राजपत्रें श्रीमंत कैलासवासी शाहुमहाराज यांची व तीर्थस्वरूप कैलासवासी नानासाहेब यांची पत्रें साधनाचीं आणून दाखविलीं त्याजवरून पंचाइतमतें मनास आणितां संस्थानचा आधिकार करण्याचा दस्तऐवजीं कागदपत्रसाधन लक्ष्मणगोसांवी व अनंतगोसांवी यांजवळ कांहींच नाही तोंडचें बोलणे मात्र बोलतात माहारुद्रगोसांवी यांणीं कागदपत्र दाखविलें त्यांत पाहतां दत्तोबा गोसांवी याचे वंशाचे राघोबा व सिवरामगोसांवी यांस संस्थानासी भांडावयास संबध नाहीं मुधोबागोसांवी याणी संस्थानचा अधिकार सिष्यपरंपरा करीत जावा असें रामदासस्वामींचे नातु गंगाधरगोसांवी यांचे विचारें निवाडा होऊन राजपत्रें जाहालीं आहेत त्याप्रमाणें भोगवटा हि आजपर्यंत चालत आहे त्याअर्थीं लक्ष्मणगोसांवी व अनंतगोसांवी याणी सिरगांवचे संस्थानी असावे डोमगांवचे संस्थानाविसीं व संस्थानचे खर्चाचे दोन गांव आहेत त्याजविसीं कलह करावयास संबंध नाही याप्रमाणे ठराव होऊन माहारुद्र गोसांवी यांचे नावे भोगवटीयास आलाहिदा निवाडपत्र करून देऊन हें आज्ञापत्र सादर केलें असें तरी संस्थान डोमगांव येथील अधिकार माहारुद्र भिमाजी गोसांवी संप्रदाये श्रीरामदासस्वामी यांजकडे सिष्यपरंपरेने चालऊन मौजे डोमगांव व गोंडरे ता। मजकूर हे दोन्ही गांव संस्थानचे खर्चाकडे चालवीत जाणे या पत्राची प्रति लेहून घेऊन हें असल पत्र मारनीलेजवळ भोगवटीयास परतोन देणे जाणिजे छ १४ जिलकाद आज्ञा[1] प्रमाण

बार

(लेखन सीमा)

हा निवाडा साडे तीन बंदी असून प्रत्येक जोडावर मागच्या बाजूस लेखनसीमेचा शिक्का आहे. हें पत्र १२३ वर्षांचें जुनें असून हि अक्षरें इतकीं नवीन दिसत आहेत व कागद मुळीं च हाताळलेला नाहीं याचें आश्चर्य वाटतें.

---

1 श्रीमंतांचें अक्षर.

लेखांक ४९३ ] १७१७ फाल्गुन शु. १२ [ अस्सल-मोडी

श्री

राजश्रीयां वीराजित राजमान्य राजश्री बाळाजी वेकटेश
संस्थान मोहरी स्वामींचे शेवेसी

पो विनायक कृष्णं नीा श्रीमंत राजश्री त्र्यबकराव आपा पेठे सा नमस्कार विनंती उपरी तुह्मी पेठे याजपासून कर्ज घेऊन मौजे मोहरी व दिघोल पाा जामखेड येथील कमाविसी सागितली त्यास माहाल मजकूर नेमून दिल्हा त्याऐवजी गुा राजश्री बाबाजीगोसावी डोमगावकर रुो

४२॥ माहे शाबान माघमास
९ कीता रुो
११ कीता रुो
४ कीता रुो
३ कीता
१३ गुां नारोबा नां सावले
परडेकर सनगाबाईत
२॥ कीता नक्त वजोरी

---

४२॥
२ माहे रमजान फाा मास
१ कीता १ कीता
रुो दोन
१०० फाा शुध १२ माहे रमजान गुा नानाजी गोसावी

---

१४४॥
येकूण येकसे साडेचवतालीस रुपये माहाल मजकूरचे ऐवजी पावले फाा शुध १२ शके १७१७ राक्षस नाम सवछरे सुा सीत तीसैन मया व अलफ बहुत काय लिहिणे हे विनंती सग १२०५

---

लेखांक ४९४ ] १७३३ पूर्व [ अस्सल-बाळबोध

॥ श्रीरामसमर्थ ॥

॥ मोक्षश्रीया वीराजीत राजेमान्य राजेश्री रघुनाथबाबा ॥
॥ व गीरमाजी बावा व लक्षुमण बावा व बाबाजी ॥
॥ बावा गोसावी यास प्रती

॥ दत्तात्रय गोसांवी संस्थान कोयाळे सां नमस्कार वीनंती उपरी यथील
॥ कुशळ जाणौन नीजानंद लीहीने वीशेष अपण पत्र राजेश्री नथुराम
॥ गोसावी याजसमागमे देउनी पाठविले ते प्रवीष्ट जालें पत्रीचा अर्थ व
॥ अनखीं स्छुळ सुक्ष्म वर्तमाने बावानी सागीतले त्यावरून श्रृत जाले
॥ सीरगावकराचा व अपला संस्थान समंधे कळह वाढोन उभयता पुनी
॥ यात उतरेनीरोतरे करतात कजीया मीठत नाही हे वर्तमान ईकडे
॥ आह्मास काही च माहीत अजपावतो नवते तों राजेश्री नथुराम बावाचे
॥ अगमने सर्व कळले येवीशईचा संशय हरयकवीशई अपण चींतात
॥ न आनावा कारण की त्यांचे व आपले भाषणे मागे होउन गेलेत
॥ तेंव्हा त्याच्याने सीष्ट कृत्य काय जाले ते अता पुढेजयप्रद होतील हे
॥ कळलेच अहे सर्व बंदोबस्त श्रीकृपेने अपले मनोदयानरूप होतील
॥ अह्मीं अपले लीहील्या अन्वय सीघ्र च यउन पोहचतो कळावे वीशेष
॥ काय लीहीने हे वीनंती

॥ स्वामीचे सेवेसी रघुनाथ गोसावी साष्टांग नमस्कार अनुक्रमे सर्वत्र मंडळीस नमस्कार

॥ ताजाकलम सीरगावकरास पत्र लीहील अहे ते अपन पाहुन
॥ हारकोना हाती त्यास प्रवीष्ट करावे ॥

---

१ ही मंडळी बहुधा वडगांवमठाची असावीत. शिरगांवकरांनीं वडगांवकरांशीं हि वाद घातला होता, असें दिसतें.

लेखांक ४९५ ] [ अस्सल-बाळबोध

॥ श्रीशंकर ॥




॥ श्रीमत्परमहंस परिव्राजकाच्यार्य पदवाक्य प्रमाण पारावार पारीण यम- ॥
॥ नीयमानस प्राणायाम प्रत्याहार ध्यानधारण समाध्यष्टांग योगानुष्टान निष्ट॥
॥ तपश्चक्रवर्य नाद्यवछिन्य गुरुपरंपरा प्राप्तव्याख्यान सकळ सिव्हा ॥
॥ सनाधीश्वर समग्र वेदार्थ प्रकाशक सांख्यत्रय प्रतिपालक सकल निग- ॥
॥ मागमसार हृदय वैदिक मार्गप्रवर्तक सर्वतंत्र स्वतंत्र आदिराजधानी ॥
॥ विद्यानगरी महाराजधानी कर्नाटक सिंहासनाधीश्वर गुरुभुमंडलाचार्य ॥
॥ ऋष्यश्रृंगपुरवराधीश्वर तुंगभद्रातीरवास चातुर्वेद पारायण षण्मत ॥
॥ स्थापनाचार्य श्रृंगेरी मठवर पट्टभद्र सिंहासनाधीष्टित श्रीमत्छंकराचार्य ॥
॥ पादपद्माराधक श्रीनृसिंह भारती करकमल संजातानुग्रहीत श्रीमहामठ- ॥
॥ वर्ती विद्वद्रज श्रीसच्चितानंद भारती तछिष्य आभीनव सच्चितानंद ॥
॥ भारतीश्वरा श्री

॥ भवानी सिषरामाद्य प्रभुतिशु नारायणस्मरणानी समुल्लसंतु ॥
॥ विशेष आम्हास येथ येउन पांच मास जाले त्यास आपण जे संभवना ॥
॥ करावयाचि ते केलि परंतु मध्यवर्ति कितीयेक ग्रहस्ताचे आनुमते ॥
॥करून गाईकवाडाकडिल कमाविसदार येणार तों आल्यानंतर तिकडिल॥
॥हि संभवना होईल अैसा सर्वत्राचे विच्यारे करून राहिलो त्याचा आर्थ॥
॥परस्परे आपणास श्रृत जाले च आहे लिहावे नलगे सर्वास कारण हे॥
॥च कि पांच शत पर्येत ब्रम्हस्व देणे जाले उपाय जेथपर्येत होता तेथ-॥
॥पावेतो केला नाविलाज होउन आपले दर्शन घडावे आणी याचा मार्ग॥
॥वीचारावा तो योग न घडे या आर्थी पत्र लिले ते वाचुन उत्तर पाठ-॥

॥ विले पाहिज़े कारण कि तुम्हि प्रभु सुज्ञ पुण्यवान् यास्तव येथुन आ- ॥
॥मचा नीर्गम होय तो आर्थ जाला पाहिजे वस्तभाव ठेउन येथील गुंता॥
॥उरकावा तरि घोडि व पालखी सिवाय काहि नाहि ते कोठे ठेउ अैसे॥
॥ बहुत जनास विच्यारिले परंतु त्याच्या आंगेष कोण्ही करिणा याज ॥
॥ कारणे आपणास सुचनार्थ लिहिले ते ध्यानी आणोन येतद्विशि मार्ग ॥
॥ काहाडावा म्हणजे श्रयस्कर आहें आपलें वचनेकरून आमचा निर्गम ॥
॥ होतो अपआपणास येष येतें कळावें ईत्यानंतनारायणस्मरणानी ॥

श्री विद्या
शंकर

---

लेखांक ४९६ ] [ अस्सल-बाळबोध

श्रीरामसमर्थ

आणापाबावास

श्री माहाराज स्वामी समर्थाचे
सेवेसी राम

बाळकें दासानुदास चरणरजकिंकर दामोदरानें चरणावरि मस्तक ठेउन सीरसाष्टांग नमस्कार विज्ञापना उपेरी वीशेश सेवकावरि कृपा करून असीर्वाद पत्र पाठउन परामरुश केला तेणें कडुन बहुत अमृतपान केल्यापेक्षा आनंद जाहाला उपरांतीक रा अपचंदमठास पाठ- वीलें जे रुपये ११११ कबुल करून गेलेत त्यास तुह्मी तेथें जाउन तुमच्या विचारें कळेल तैसें रुपये वसुल करून घेउन येणें ऐसीयास तेंहीं अह्मास तगादा केला तरि डोमगांवास आवघे मीळोन आलों होतों तेथें मजला चरणसेवेसी सन्नीध ठेउन माझें पत्र आपणासीं ठेउन रामाजी गों यांचे स्वाधेन स्छळ केलें उपरांती श्री नवमीचा उत्छाह हरगुळांमधें जाल्या उपरांतीक आज्ञा दिधली पुढें दुसऱ्या मोहोछायास डोमगावांस येणें ह्मणउन अज्ञा केली वचनावरून

अलों परंतु मागुती आज्ञा केली जे रामनवमीस येणें मग बेंबळीस आलों तेथें आवघे महंत मीळुन मजपासीं ११११ रुपयाचें पत्र घेउन आपुलें पत्र देउन अज्ञा केली जे जैसें तुमच्या चित्तास येइल तैसा आपुला कार्यभाग करुन घेणें अज्ञेवरुन स्छळास आलों येथें सर्व प्रकारें वीलग पाहुन स्छळास नाश करुन आपुले सीरीं आपकीर्ती न घ्यावी ह्मणउन च्यार दीवस गेलों पुढें आपुली सर्व बंदोबस्ती करुन मागुती डोंबगावास आलों ते समईं माझा आन्हेर करुन रामाजी गों यांचे स्वाधेन स्छळ केलें आमुचें पत्र रद करुन आह्मास देशधडी केलें या लोकामधें मुख न दाखवावें ऐसा वीचार जाला मागुती गेले स्छळीं उपद्रव लावीला जे रुपयं देणें ऐसीयास आतां प्रस्तुत ऐसें दिसोन आलें जें द्विपांतर उलंघुन जावें लागेल तथापि शक्तीनसार सेवा करावी तरि निद्रवी पुरुश जे आहेत तेंही काय सेवा करावी वीशेश ल्याहावें तरि (म)हा(रा)ज समर्थ आहेत सर्व अन्याय क्षमा केला पाहीजे हे विनंती लक्ष

---

लेखांक ४९७ ] [ अस्सल-बाळबोध

श्रीरामसमर्थ

श्रीरामदासस्वामी

आनेकासीर्वाद उपरि येथिल वर्तमान शनवार प्राथकाळपर्यंत येथास्थित आसे यानंतरें आपणास या प्रांते येउन पंधरा दिवस जालें ह्मणुन वर्तमान आजि आपणाकडुन गडि आला त्याणें सांगितलें त्यावरुन संतोष जाला यानंतरें डोमगांवास व चिंचोलिस ऐसिं दोन पत्रें येथुन पाठवीलिं आहेत तिं आपूले वाकिफ मनुष्य पाठउ सत्वर त्यास प्रविष्ट होत ऐसें करावें आनुमान तिळभर न करा आणि आपण पत्र पावतां च चाफळास यावें आह्मास भेटल्यावीना आपण जाणार नाहित च परंतु निकडिमुळें घाटांखालें आथवा वर गेला आसिला तरिं माघारें फीरोन आगत्य यावें भेटीवीना सहसा जाउ नये या पत्राबराबरि तेथे

तुह्मि आपुलि पत्रे देउन दोघांचि हि येथे येणी होत ऐसें करावें आपण व आह्मि यात्रा देवापासि येका जागा करुं वरकड वर्तमान जबानि गोवींद सांगता कळेल आगत्य यावें हे आसिर्वाद

---

लेखांक ४९८ ] [ अस्सल-मोडी

श्री

तीर्थस्वरूप राजश्री जीज्या व काका व दाजीसाहेब
वडिलाचे शेवेसी

बालके आंबाजीराव घाटगे चेरणी मस्तक ठेउन सीर सां दंडवत विज्ञापना ता जेष्ठ वा ९ मुकाम छयावणी नजिक ग्वालेर येथें वडिलाचे आसिर्वादेकरून समस्त सुखरूप आसो विशेष वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री बाबाजी गोसावी संस्तान मौजे डोमगाव याजकडे मौजे बेलवडी ता कडे येथील स्वराज्य आमल निमे त्याजकडे व निमे आपल्याकडे याप्रो येथील सरकारची हि सनद त्या अन्वये निमे वसुल त्याजकडे व निमे वसुल आपणाकडे असावा ते न होता इथापे याचे सांगितल्यावरून बेलवडीत कारकून कमाविसीस राहातात त्याणी हजार रुो त्याच्या वसुलापो आटकाऊन ठेविलेत ह्मणौन गोसावी बावानी राजश्री सखाराम बापु भोसले पाटील मोकदम मौजे बेलवडी यास पत्र लिहीले त्यास लावले ईथापे याचे सांगितल्यावरून त्याचा ऐवज आटकाऊन ठेवावा हे प्रशस्ते नाही त्याची योग्यता कसी हे ध्यानात न राहाता मनास येईल तसे + + ++ गतात त्याप्रो तेथील कारकून करितात हे काये असो पत्रदर्शणी त्याचा ऐवज त्याजकडे द्यावा आणि पुढे मागील वहिवाटीप्रो निमे वसूल त्याजकडे देऊन निमे आपण घेत जावे गोसावीबावाचा बोभाटा हरयेकविसी येऊ नये गोसावीबावाचा ऐवज देऊन त्याची पावती घेऊन पाठवावी कलावे शेवेसी श्रुत व्हाये

---

**लेखांक ४९९-१ ]** १६२१ आश्विन वद्य १४ **[ अस्सल-मोडी**

श्रीसमर्थशिष्य बाजी गोसावी यांचा मठ शिरवळास होता व तेथें त्यांची समाधी आहे. बाजी गोसावी हे जातीचे मराठे होते. त्यांच्या एका वंशजाकडून प्रस्तुतचे कागद मिळाले. या कागदांच्या आधारें बाजी गोसावी यांची थोडीशी माहिती **श्रीसांप्रदायिक विविध विषय**, विषयांक ५, यांत दिलेली आहे, ती अवश्य पहावी. त्या विषयांकांत प्रस्तुतच्या कागदपत्रांचा ज्या लेखांकांनीं निर्देश केला होता ते अंक समजुतीसाठीं, मागाहून चालत आलेल्या अंकांपुढें देत आहे. विषयांक ५ वा एकवार वाचला म्हणजे पुढील लेखांकांची उपयुक्तता वाचकांच्या सहज च ध्यानांत येईल.

श्री

रामदास

राजश्री शामजी हरी नामजाद व कारकून हाल व इस्तकबाल सुभा मावळे गोसावी यास

•॥ [1] अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य सेवक शंकराजी नारायेण सचीव नमस्कार सुा सन खमस मया अलफ हारिभक्तपरायण बाजी गोसावी वास्तव्य काा सिरवल हे श्री स्वामींचे शिष्य याचा मठ काा मजकुरी आहे हे भले योग्य रघुवीरभक्त याचे मठी प्रत्यही कथा उत्छाह होतो त्यास दीपास तेलाची मोईन केलीयाने राज्याची अभिवृधी आहे याकरिता मठास तेलाची मोईन दरोज वजन टक तेल८८।• पाउसेर रास मोईन केली असे तरी सदरहू मोईनी प्रो तेल साल दर साल काा मजकूर पैकी गौसावीयास शिष्य परंपरेने देत जाणे प्रतिवर्षी ताजे सनदेचा उजूर न करणे तालीक लेहून घेऊन असल सनद भोगवटीयास गोसावीयाजवली परतोन देणें ꣵ

(मुद्रा: श्री शंकराजी नारायण)

२७ जमादिलाखर पाा हुजूर

(पत्रा वधिरयं भाति)

बार सुरु सुद बार

---

१ येथून निराळें अक्षर.

लेखांक ५० १६२६ आश्विन वद्य १४ [ अस्सल-मोडी

श्री

राजश्री रावो गोमाजी हावालदार व कारकून हाल व
इस्तकबाल पा। सिरवल गोसांवी यांस

·॥ॐ)

सेवक शामजी हरी सभासद नामजाद व कारकून सुभा प्रात मावल नमस्कार सुहुर सन खमस मया अलफ बा। सनद राजश्री पंत सचीव छ २७ जमादिलाखर पौ। छ मजकूर तेथे आज्ञा की हरिभक्तपरायेण बाजी गोसावी वास्तव्य कसबे सिरवल हे श्री स्वामीचे सीष याचा मठ कसबे मजकुरी आहे हे भले योग्य रघुवीरभक्त याचे मठी प्रतही कथा उछाह होतो त्यास दिपास तेलाची मोईन केलीयाने राज्याची अभिवृधी आहे याकरिता मठास तेलाची मोईन दरोज वजन टा। तेल ८८। पावसेर रास मोईन केली असे तरी सदरहू मोईनप्रमाणे तेल साल दर साल कसबे मा।रपैकी गोसावीयास सीश्यपरंपरेने देत जाणे प्रतिवर्षी ताजे सनदेचा उजूर न करणे तालिक लेहून घेऊन असल पत्र भोगवटीयास गोसावीयाजवल परतोन देणे ह्मणु ( न ) अज्ञा अज्ञेप्रमाणे सदरहू तेलाची मोईन साल दर साल सीश्य परंपरेने गोसावी याच्या मठास देविली असे तरी सदरहू प्रा। का। मजकूरपैकी देवित जाणे सनदेची तालिक लेहून घेऊन असल सनद भोगवटीयास गोसावीयाजवली परतोन देणे जाणिजे छ २७ जमादिलाखर मोर्तब सुद







---

१ येथून अक्षर निराळें. २ या शिक्यांत जीं तीन अधिकाचीं चिन्हें आहेत तेथें " शेवगा" अशीं कांहीं अक्षरें आहेत.

लेखांक ५०१-३ ] १६२६ आश्विन वद्य १४ [ अ. मो.

श्री




रामदास

अज्ञापत्र राजश्री पंतसचीव तां मोकदम व सेटे माहाजन का। सिरवळ सुहुर सन खमस मया अलफ हरिभक्तपरायण बाजी गोसावी वास्तव्य का। मजकूर हे श्री स्वामींचे शिष्य याचा मठ का। मजकुरी आहे तेथें प्रत्यही कथा उत्छाह होत आहे त्यास मठी दिपाची मोईन दरोज तेल वजन टा। ८८।· पावसेर रास मोईन केली असे आणि अलाहिदा सनद सुभा मावले येथे सादर केली आहे त्याप्रमाणे तेल साल दर साल शिष्यपरंपरेने पावित जाणे छ २७ जमादिलाखर पां हुजूर

पत्र. वधिरयं भाति

बार सुरु सुद बार

---

लेखांक ५०२-४ ] १६२८ भाद्रपद वद्य ९ [ अ. मो.

श्री

·॥[1]

मा। अनाम देशमुख व देशकुलकर्णी पा। सिरवळ यास शंकराजी नारायेण सचीव सुहुर सन सबा मया अलफ हारभिक्त बाजी गोसावी यांचा मठ कसबे सिरवळ येथे आहे त्यास मठी दिवाबतीस तेलाची मोईन दरोज ८८॥ अदसेर व प्रतिवर्षी मोईन रुपये २५ पंचवीस पुर्वी करून दिल्ही आहे ऐसीयास बाजी गोसावी यांस देवाब्रा




१ येथून अक्षर निराळें.

जाली त्याचे पुत्र रामाजी गोसावी मठी आहेत याकडे कसबे मजकूर तेल सदरहू मोईन प्रा रोज दरोज पावित जाणे व नख्त ऐवज ही प्रतिवर्षी पावीत जाणे साल दर साल ताजे सनदेचा उजूर न करणे तालिक लेहून घेऊन असल सनद गोसावीयाजवली परतोन देणे छ २२ जमादिलाखर पो हुजूर

पत्रा
वधिरयं
भाति

सुरु सुद

लेखांक ५०३–५ ] १६३० मार्गशीर्ष शुद्ध ८ [ अस्सल-मोडी

श्री

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री शामजी हरी
ना व कारकून सुभा मावले यांस

सेवक नारो शंकर सचीव नमस्कार सुहुर सन तिसा मया अलफ हरिभक्तपरायण बाजी गोसावी याचा मठ का सिरवल येथे आहे त्यास मठी दिवाबतीस तेल दररोज आदसेर व नख्त सालीना रुपये पंचवीस मोईन करून पेशजी सनद माहालास व देशमुख देशपांडियास सादर आहे त्यास मोईन प्रा कसबाहून पावावे ते पावत नाही म्हणऊन + + + + + + + + आज्ञा जाली + + + रामाजी गोसावी आहेत त्यास सदरहु मोईन प्रो तेल व नख्त पावले पाहिजे तरी तुम्ही माहालकरी यास ताकीद करून तेल व नख्त कसबा पैकी पावणे नख्त मोईन प्रमाणे पावे ते करणे बोभाट येऊ न देणे छ ६ रमजान

पत्रा
वधिरयं
भाति

सुरु सुद

1 येथून अक्षर निराळें.

लेखांक ५०४–६ ] १६३० मार्गशीर्ष शुद्ध ८ [ अस्सल-मोडी

श्री

·॥ऽ॥

मा। अनाम देसमुख देसकुलकर्णी प्रा। सिरवल यास नारो शंकर सचीव सु॥ तिसा मया अलफ हरिभक्तपरायण बाजी गोसांवी याचा मठ कसबे सिरवली आहे त्यास मठी दिवाबतीस तेलाची मोईन दररोज आदसेर व प्रतिवर्षी पंचवीस रुपये आहेत ( पुढील २ ओळी फाटल्या आहेत ) आले तरी मोईन करून सनद दिल्ही असता न पावायास गरज काये आहे या उपर मोईन प्रा। तेल व नख्त पावणे बोभाट येऊ न देणे छ ६ रमजान

श्री
शंकराजी
नारायण

पत्रा
वधिरयं
भाति

सुरु सुद

---

लेखांक ५०५–७ ] १६३० मार्गशीर्ष शु॰ ८ [ अस्सल-मोडी

श्री

राजमान्य राजश्री राघो गोमाजी हवालदार व कारकून पा। सिरवल यास नारो शंकर सचीव सुहु॰ सन तिसा मया अलफ हरिभक्तपरायेण बाजी गोसावी याचा मठ कसबे सिरवल येथे आहे त्यास मठी दिवाबतीस तेलाची मोईन दरोज आदसेर व प्रतिवर्षी पंच(वीस) रुपये मोईन करून पेशजी सनद माहालास सादर आहे त्या ( २ ओळी फाटल्या आहेत ) न पावायास गरज काये आहे याउपर सनद प्रा। तेल व नख्त ऐवज पावणे बाभाट येऊ न देणे छ ६ रमजान

पत्रा
वधिरयं
भाति

सुरु सुद

लेखांक ५०६-८ ]		१६३० मार्गशीर्ष शुद्ध १०		[ अस्सल-मोडी

श्री

मा। अनाम देसमुख व देशपाडे प्रा। सिरवळ यासी नारो शंकर सचीव सु॥ तिसा मया अलफ रा॥ बाजी गोसावी याचे पुत्र रामाजी

श्रीरामभजना
सक्त नारायण जन
+ + ॥ शंकरस्य शु
भा मुद्रा पूर्णेंदुरि
व राजते

गोसावी वास्तव्य का। सिरवळ यास विचित्रगडचे मुकामीहून नूतन इनाम अडदरापुर मला व वर्षासन पचवीस रुपये व मठी दिपास तेल दरोज वजन टा। ऽऽ। पावसेर करून दिल्हे आहे त्या प्रा। याचे चाल(वणे) फिरोन बोभाट येऊ न देणे जाणिजे छ ८ रमजान पा। हुजूर

भाल्य
यं लेखना
वधिः

सुरु सुद

---

लेखांक ५०७-९ ]		१६३० मार्गशीर्ष शुद्ध १०		[ अस्सल-मोडी

श्री

अखंडित लक्ष्मी अलकृत राजमान्य राजश्री शामजी हरि
नामजाद व कारकून प्रांत मावले ता। राजगड गो। यांस
सेवक नारो शंकर सचीव नमस्कार सु॥ तिसा मया अलफ राजश्री बाजी गोसावी याचे पुत्र रामाजी गोसावी वास्तव्य कसबे सिरवळ यास विचित्रगडचे मुकामीहून नूतन इनाम अडदरापूर मला व वरषासन रुपये २५ पचवीस व मठी दीपास तेल दरोज वजन टा। ऽऽ। पावसेर करून दिल्हे आहे त्याप्रमाणे चालवणे छ ८ रमजान पा। हुजूर

भाल्य
यं लेखना
वधिः

सुरु सुद

---

१ येथून अक्षर निराळे.

लेखांक ५०८-१० ] १६४२ मार्गशीर्ष वद्य ३० [ अस्सल-मोडी

श्री

मा। अनाम देशमुख व देशपांडे पा। सिरवल यासी पंताजी सिवदेव सु॥ इहिदे अशरीन मया आलफ राजश्री बाजी गोसावी याचे पुत्र रामाजी गोसावी वास्तव्य कसबे मजकूर यास पूर्वी राजश्री पंतसचीव कैलासवासी याणी वर्षा( स )न रुपये २५ पचवीस व तेल ८२। सवा दोन केले आहे ते इतलाख पावत नाही या करिता सदरहुचे पड जमीन राजश्री मोरोपंत याचे सिरस्ता प्रमाणे पड जमीन नेमून देणे जाणिजे छ २८ सफर

श्री० भार्गव चरणी तत्पर पंताजी शिवदेव नीरंतर

मोर्तब सुद

सुरु सुद

लेखांक ५०९-११ ] १६४२ फाल्गुन वद्य ४ [ अस्सल-मोडी

श्री

राजश्री तुको धोंडदेउ हवालदार व कारकून पा।
सिरवल गोसांवी यांसि

अखंडीत लक्ष्मी आलकृत राजमान्य सेवक शामजी हरी नामजाद सुभा व कारकून प्रांत मावले नमस्कार सुहूर सन इहिदे असरैन ( मया[1] ) अलफ बा। सनद राजश्री पंताजीपंत छ २८ सफर तेथे आज्ञा की राजश्री बाजी गोसांवी यांचे पुत्र रामाजी गोसांवी वास्तव्य कसबे सिर ( वल ) यांस राजश्री पंत सचीव वैकुंठवासी यांनी वर्शासन रुपये २५ पंचवीस व तेल टा। ८२। सवा दोनी मण केले आहे त्यास इतलाख ऐवज पावत नाही याकरिता सदरहु ऐवज राजश्री मोरोपंताचे शेरीस्तेप्रमाणे पड जमीन कसबे मजकूर पैकी नेमून देणे ह्मणऊन आज्ञा आज्ञेप्रमाणे तुह्मास सनद सादर केली

---

१ फाटण्यांत गेलें आहे.

असे तरी कसबे मजकूर पैकी रामाजी गोसांवी यांसि पड जमीन बीघे ८८ आठ यांसी देविली असे यास आठ बीघे नेमून देऊन तेथील आकार होईल तो सदरहु मोईन वर्शासन केले आहे त्यापैकी दुमाला खर्च लिहीणे देखील मोगलाई याचे दुमाल खर्च लिहीणे जाणीजे छ १७ जमादीलौवल मोर्तब सुद







---

लेखांक ५१०-१२ ] १६४२ फाल्गुन वद्य ५ [ अस्सल-मोडी

श्री

राजश्री केदारजी येसवत राऊ निगडे देसमुख व यादो गगाधर देसकुलकर्णी प्रा। सीरवल गौ। यांसि

•॥ॐ॥ अखडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्री तुको धोडदेव हवालदार व कारकून प्रा। सीरवल आसीर्वाद व नमस्कार सु॥ इहिदे असैरन मया अलफ बा। सनद सुभा छ १७ जमादीलौवल तेथे अज्ञा की राजश्री बाजी गोसावी यांचे पुत्र रामाजी गोसावी वास्तव्य कसबे सीरवल यांस राजश्री पंत संचीव वैकुठवासी यांणी वर्शासन रुा। २५ पंचवीस व तेल टा। ८२।• सवादोन मण केले आहे त्यास इतलाख ऐवज पावत नाही याजकरिता सदरहूचा ऐवज राजश्री मोरोपंताचे शीरीस्ते प्रमाणे पड जमीन कसबे मजकूर पैकी नेमून देणे ह्मणऊन अज्ञा अज्ञेप्रमाणे हे सनद तुह्मास सादर केली असे तरी कसबे मजकूरपैकी रामाजी गोसावी यांसि पड जमीन बीघे ८८ आठ यास देविली असे यास आठ बीघे जमीन नेमून देऊन तेथील अकार

होईल तो धर्मादाऊ खर्च लिहिणे सदरहु मोईन पैकी खर्च लिहिणे




दीगो मोगई जमीन आठ बीघे नेमून देणे जो अकार होईल तो याच्या दुमाला दीगो मोगलाई दुतर्फा खर्च लिहिणे जाणजे छ २० जमादीलौवल मोर्तब सुद




---

**लेखांक ५११-१३ ]** १६४४ श्रावण वद्य ११ **[ अस्सल-मोडी**

श्री




रामदासस्वामी

आज्ञापत्र समस्त राजकार्येधुरधर विस्वासनिधी राजमान्ये राजश्री नारो पंडित सचीव ताहा मोकदमानी कसबे सिरवल सुहुर सन सलास आसैरन मया आलफ रामाजी गोसांवी बिन बाजी गोसांवी परंपरा श्री वास्तव्य का। सिरवल योजी हुजूर राजश्री स्वामी सनीध किले सातारचे मुकामी येऊन विनती केली कीं आपले बाप बाजी गोसांवी थोर सत्पुरुष होते ते पुर्वी मृत्यै पावले त्याचे वृंदावन का। मारीं बाधले आहे ते साप्रत गतवर्षापासून डोलतें त्याचा पूजा

---

१ मोगलाई मधला "ल" गळाला आहे. २ 'जी' आहे पण तें 'नी' च वाचलें पाहिजे. गांठ पोकळ आहे इतकें च. ३ बाजी यांची पुण्यतिथी मार्गशीर्ष वद्य ८ होय असें त्यांचे वंशज सांगतात.

नैवेद्य चालवयास नूतन इनाम जमीन दिल्हीयाने वृंदावनाचा पूजा नैवेद्य चालऊन स्वामीस व स्वामीच्या राज्यास कल्याण चीतुन राहोन ह्मणून विनती केली त्यावरून बाजी गोसावी भले सत्पुरुषं थोर होते त्यांचे वृंदावनाचा पूजा नैवेद्यास इनाम जमीन दिल्हीयाने श्रयेस्कर येैसे जाणून राजश्री स्वामींनी याजवरी कृपाळु होऊन का। मार-पैकी नूतन इनाम जमीन खालीसा पड पैकी बिघे १० दाहा इनाम करून देऊन पत्रें सादर केली आहेत त्या प्रमाणें सदरहु जमीन दाहा बिघे आवल दुम सीम तीन प्रतीची चतुःसीमापूर्वक यांचे दुमाला करून यांस व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम चालवणे या पत्राची प्रति लेहून घेऊन असल[1] पत्र भोगवटीयास गोसावीयाजवळ परतोन देणे जाणीजे छ २४ जिलक




सुरु सुद बार

---

लेखांक ५१२-१४ ] १६४४ श्रावण वद्य ११ [ अस्सल-मोडी

श्री

रामदास स्वामी

राजश्री देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी प्रां। मावळें गोसांवी यासी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये सेवक नारो शंकर सचीव न-मस्कार सुहुर सन सलास आसरैन मया आलफ रामाजी गोसावी बिन बाजी गोसावी परंपरा श्री वास्तव्य का। सिरवळ याणी हुजूर राजश्री स्वामी सानिध साताराचे मुकामी येऊन विनती केली कीं आपले बाप बाजी गोसावी थोर सत्पुष होते ते पुर्वी मृत्य पावले त्यांचे वृंदावन का। मारी बाधले आहे सांप्रत गतवर्षापासून डोलत आहे

१ मुळांत ‘ रु ’ गळाला आहे.

त्याचा पुजा नैवेद्य चालावा लागतो त्यास नूतन इनाम जमीन करून दिल्हीयाने वृंदावनाचा पुजा नैवेद्य चालऊन स्वामीच्या राज्यास व स्वामीस कल्याण चितून राहोन ह्मणून विनति केली त्यावरून बाजी गोसावी थोर सत्पुरुष त्यांचे वृंदावनाचा नैवद्य पुजा चालावयास इनाम जमीन दिल्हींयाने श्रेयस्कर यैसे राजश्री स्वामीनी जाणून याजवरी कृपाळु होऊन का। सिरवल पैकी नूतन इनाम जमीन खालिसा पड पैकी अवल दुम सीम तीन प्रतीची जमीन बिघे ८१० दाहा इनाम करून देऊन पत्रे दिल्ही आहेत त्याप्रमाणे सदरहु दाहा बिघे जमीन रामाजी गोसावी याचे दुमाला चतु:सिमापूर्वक करून यास व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम चालवणे या पत्राची प्रति लेहून आसल पत्र भोगवटीयास गोसावी याजवल परतोन देणे जाणिले छ २४ जिलकाद

श्री
शंकराजी
नारायण

पत्रा
वधिरयं
भाति

सुरु सुद बार

---

लेखांक ५१३-१५ ) १६४४ श्रावण वद्य १४ [ अस्सल-मोडी

श्री

राजश्रीया विराजित राजमान्य राजश्री शामजी हरी
नामजाद व कारकून सुभा मावले स्वामी गो॥ यांसी

सेवक पंताजी सिवदेव नमस्कार सु॥ सलास आसरीन मया आलफ रामाजी बिन बाजी गोसावी वास्तव्य कसबे सिरवल यांजवरी राजश्री स्वामी कृपाळु होऊन कसबे मजकूरपैकी इनाम जमीन बिघे ८१० दाहा बिघे करून दिल्हे आहे येविसी राजपत्रें व जिल्हेचीं पत्रें

---

१ जोड असून जोडावर " पत्रावधिरयं भाति " चे दोन शिक्के आहेत.

आलाहिदा सादर आहेत दुतर्फा मोगलाई देखील इनाम दिल्हा आहे त्याप्रमाणें पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने रामाजी गोसावी याचा इनाम चालवणे प्रतिवर्षीं नूतन पत्राचा अक्षेप न करणें या पत्राची तालीक लेहून घेऊन असल पत्र त्यांजवल भोगवटीयास परतोन देणे छ २७ जिलकाद

मोर्तब
सुद

---

लेखांक ५१४-१६ ] १६४४ आश्विन वद्य १ [ अस्सल-मोडी

श्री

रामदासस्वामी

राजश्री तुको धोंडिदेव हवालदार व कारकून वर्तमान
व भावी प्रा सीरवल गो

॥ॐ॥

अखडींत लक्ष्मी अलंकृत राजमान्य सेवक शामजी हरी नामजाद व कारकून सुा प्रा मावले नमस्कार सुा सलास असैरन मया अलफ बा सनद राजश्री स्वामी शके ४९ सुभकृत संवछरे अधिक श्रावण बहुळ पंचमी मंदवासरे तेथे आज्ञा जे रामाजी बीन बाजी गोसावी परंपरा श्री वास्तव्य कसबे सीरवल हे स्वामी सनीध येऊन विदित केले की आपले बाप बाजी गोसावी सत्पुरुष होते ते पुर्वी शांत जाले त्याचे वृंदावन काा मजकुरी बाधळे आहे ते साप्रत गतवर्शापासून डोलते हा चमत्कार बहुत लोकानी पाहिला आहे तेथे पुजा नैवेद्य व पुण्यतिथीचा उत्छाह चालिला पाहिजे तरी स्वामीनी कृपाळु होऊन नूतन इनाम जमीन दिल्हीयाने स्वामीस व स्वामीचे राज्यास कल्याण चीतुन राहो ह्मणून विनती केली त्यावरून मनास आणीता बाजी गोसावी बहुत भळे सत्पुरुश होते त्याचे वृंदावन डोलते हे गोस्ट येथार्थ च आहे तेथे पुज नवैद्य व नदा-

दीप व पुण्यतीथीचा उत्छाव चालियाने उतम अहे या करीता स्वामी कृपाळु होऊन रामाजी बीन बाजी गोसावीयासि का। सीरवल प्रा। मा। पैकी नूतन इनाम पडी जमीन बीघे ८१० दाहा कुलबाब कुलकानु हाली पटी व पेस्तर पटी खेरीज हकदार इनाम करून दिल्हा असे तरी तुह्मी सदरहु जमीन अवल दुम सीम तीन प्रतीने नेमून देऊन यासि व याचे पुत्रपौत्रादि वौसपरंपरेने इनाम चालवीत जाणे ह्मणुन आज्ञा आज्ञे प्रमाणे रामाजी बीन बाजी गोसावीयासि का। सीरवल पैकी इनाम जमीन ८१० दाहा बीघे देवीले असेती अवल दुम सीम तीन प्रतीने नेमून देऊन

× × ० × श्रीमत्स्वामि × + + + ठाई तत्पर शाम जी हरी निरं ×तर × ×

दुमाले करणे तेथील अकार होईल तो इनाम दुमाल खर्च लिहीत जाणे या पत्राची तालीक लेहून घेऊन असल पत्र भोगवटीयासि परतोन देणे जाणीजे रा। छ १४ मोहरम

लेख नावदा भाती

---

**लेखांक ५१५-१७ ] १६४४ आश्विन वद्य २ [ अस्सल-मोडी**

श्री

रामदासस्वामी

राजश्री केदारजी येवंतराऊ[1] निगडे देशमुख व यादो गंगाधर देसकुळकर्णी प्रा। सिरवल गोसावी यासि

॥ ॥

आखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये श्री तुको घोडदेऊ हवालदार व कारकून प्रा। सिरवल आसिरवाद व नमस्कार सु॥ सलास आसरैन मया अलफ बा। सनद सुभा छ १४ मोहरम तेथे आज्ञा की

---

१ मुळांतच 'येवतराऊ' आहे पण 'येसवतराऊ' पाहिजे. मागील लेखांक ५१०-१२ पहा.

शेके ४९ सुभकृत सवछरे आधिक श्रावण बहुत पचमी मंदवारे तेथे आज्ञा जे रामाजी बिन बाजी गोसावी परंपरा श्री वास्तव्ये का सिरवल हे स्वामीसनीध येऊन विदित केले की आपले बाप बाजी गोसावी सत्पुश होते ते पुर्वी शांत जाले त्याचे वृंदावन का मजकुरी बाधले आहे ते साप्रत गतवर्शापासून डोलते हा चमत्कार बहुता लोकानी पाहिला आहे तेथ पुजा नैवेद्य व पुण्यतिथीचा उत्छाह चालिलीला पाहिजे तरी स्वामीनी कृपाळु होऊन नूतन इनाम जमीन दिल्हीयाने स्वामीस व स्वामीच्या राज्यास कल्याण चितून राहो ह्मणून विनती केली त्यावरून मनास आणितां बाजी गोसावी बहुत भले सत्पुरुश होते त्याचे वृंदावन डोलते हे गोस्ट येथार्थ च आहे तेथे पुजा नैवेद्ये व नदादीप व पुण्यतिथीचा उत्छाहा चालिलीयाने उतम आहे या करितां रामाजी बिन बाजी गोसावी यासि का सिरवल प्रा मा पैकी नूतन इनाम पडजमीन बिघे ८१० बाब कुलबाब कुलकानु हली पटी व पेस्तरे पटी खेरीज हकदार इनाम करून दिल्हा आस तुह्मी सदरहु

श्रीराम<br>चरणि तत्पर तु<br>को धोंडदेव नी<br>रंतर

जमीन अवल दुम सीम तीन प्रतीन नेमून देऊन यासी याचे पुत्रपौत्रादि वौशपरंपरेने इनाम चालवित जाणे ह्मणून आज्ञा आज्ञे प्रमाणे रामाजी बिन बाजी गोसावी यासि का सिरवल पैकी इनाम जमीन बिघे ८१० दाहा देविले आसती अवल दुम सीम तीन तीने नेमून देऊन दुमाले करणे या पत्राची तालिक लेहून घेऊन आसल पत्र भोगवटीयासी परतोन देणे जाणिजे रा छे १५ मोहरम मो सुद

मोरतब<br>सुद

१ मुळांत च असें आहे. २ येथून निराळे अक्षर.

लेखांक ५१६-१८ ] १६५४ चैत्र शुद्ध १२ [ अस्सल-मोडी

श्री

राजश्री कोंडाजी पवार गोसावी यांसी श्री॥ नारो शंकर सचीव असिरवाद सुहुर संन इसंने सलासीन मयां अलफ बाजी गोसावी वास्तव्य कसबे सिरवल याचें कसबे मजकुरीं इनाम बिघे ८ आठ दुतर्फा आहे त्याप्रमाणे करार च आहे तरी तुह्मीं देशमुख देशपांडे यांस ताकीद करून याचे इनाम याकडे सुरलित चाले ते गोष्टी करणे फिरोन बोभाट येऊ न देणे छ ११ सौवाल पौ। हुजूर

पत्रा
वधिरयं
भाति

सुरु सुद

लेखांक ५१७-१९ ] १६५४ चैत्र शुद्ध १२ [ अस्सल-मोडी

श्री

॥[1]

मा। अनाम देशमुख व देशपांडे पा। सिरवल यांसि नारो शंकर सचीव

श्री
शंकराजी
नारायण

सु॥ सन इसने सलासीन मया अलफ बाजी गोसावी याचे इनाम कसबे मजकुरी बिघे ८ आठ आहे त्या प्रमाणें करार च आहे तरी तुह्मीं सदरहु इनाम याकडे सुरलित चालवणे कथला न करणें याचे इनाम पेशजीपासून चालिले असता हाली तुह्मी कथला करितां ह्मणून हुजूर विदित जाले तरी तुह्मांस कथला करावयास गरज काये याउपर सदरहू इनाम याकडे चालवणें उजूर न करणे छ ११ सवाल पौ। हुजूर

पत्रा
वधिरयं
भाति

सुरु सुद

---

१ येथून निराळें अक्षर.

लेखांक ५१८—२० ] १६८२ पौष वद्य २ [ अस्सल-मोडी

श्री

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री रामाजी
याद(व) नामजाद दिा खालिसा पाा सिरवल गोसावी
यासी

सेवक सदासिव चिमणाजी सचीव नमस्कार सुाा इहिदे सितैन मया अलफ बाजी गोसावी तांबे मठ काा मजकूर याचे इनाम बिघे २० वीस आहे त्याजवरी जफ्तीचे रुपये १० दाहा लाविले होते ते तूर्त तकूब केले असेत तरी गोसावी मजकूरास वसुलाचा तगादा न करणे शेत मळून नेतील त्यास नेऊ देण छ १४ जमादिलाखर पाा हुजूर

लेखना वधिः

बार सुरु सुद

लेखांक ५१९-२१ ] १६८२ पौष वद्य ९ [ अस्सल-मोडी

श्री

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री रामाजी
यादव दिा खालसा पाा सिरवल गोसावी यांस

सेवक सदासिव चिमणाजी सचीव नमस्कार सुाा इहिदे सितैन मया अलफ बाजी गोसावी याचे इनाम काा मारी आहे त्याचे जफ्तीचा ऐवज माफ केला असे तर गोसावी मााास जफ्तीच्या वसुलाचा तगादा न लावणे छ २१ जमादिलाखर पाा हुजूर [२]



बार सुरु सुद

१ येथून निराळें अक्षर. २ अस्पष्ट आहे. बहुधा मागील लेखांकाप्रमाणें.

लेखांक ५२०-२२ ] १७१७ पौष वद्य ६ [ अस्सल-मोडी

श्री




स्वारी राजश्री नारायेणराव जीवाजी ता। मोकदमान मौजे खंडाले पो। सिरवल सु॥ सीत तिसैन मयां व आलफ मौजे मजकुरीं जानबा तांबे याची चौगुलकीच्या वतनाची वहिवाट पहिलियापासून चालत आली मर्धी मा।रनिले परागंदा जाहाले होते ते हाली येऊन वतनाची वहि-वाट करणार ह्मणोन विदित केल्यावरून हे पत्र सादर केले आसे तरी याची वतनासंमधी वहिवाट पहिले प्रा। चालवीत जाणे येविसीचा बोभाट येऊ न देणे जाणिजे छ १९ रजब मोर्तब[1] सुद




लेखांक ५२१-२३ ] १७१७ पौष वद्य ६ [ अस्सल-मोडी

श्री




स्वारी राजश्री नारायेणराव जीवाजी ता। देशमुख व देशपांडिये पो। सिराले सु॥ सीत तिसैन मयां व आलफ मौजे खंडाले पो। मजकूर येथे जानबा तांबे याची चौगुलकीच्या वतनाची वहिवाट पहिले पासून चालत आली मर्धी मा।रनिले परांगदा जाहाला होता तो हाली येऊन वतनाची वहिवाट करणार ह्मणोन विदित केल्या वरून हे पत्र तुह्मास

---

१ येथून निराळें अक्षर.

सादर केले आसे तरी पहिले पासून तांबे मजकूर याची वतनसंमधी वहिवाट आसेल त्यांत दिकत न करितां चालो देणे येविसीचा बोभाट फिरून येऊ न देणे जाणिजे छ १९ रजब मोर्तबं सुद

श्री
मोर्तब
सुद

---

लेखांक ५२२-२४ ] १७१८ आषाढ शुद्ध ९ [ अस्सल-मोडी

श्री

राजश्री कृष्णराव बाजी कादार पो श्रीगोंदे वगैरे ता
निहाय गोसावी यांसी

अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नो दौलतराव सिंदे रामराम सुा सबा तिसैन मया व अलफ जानोजी ताबे याणी विदित केले की मौजे खंडाल पो सिराले येथील चौगुलकीचे वतन आमचे वडील अनभवित असतां दरम्यान पाटलाच्या कलहामुळ आमचे वडील गाव सोडून परागंदा जाले मागे निबरुला कुणबी याचे हाते काम चौगुलकीचे गावकरी घेतात त्यांस ताकीद होऊन आमचे वतन आह्माकडे चालविले पाहिजे ह्मणोन त्यावरून हे पत्र तुह्मास सादर केले आसे तर मौजे मजकूरचे पाटील कुलकर्णी व व पाढर आणोन त्याचे विद्यमान चौकसी करून याची चौगुलकी पाटलाचे कलहामुळे बंद होऊन दुसरा करीत अस्त्यास त्याजकडून दूर करून सुदामत प्रो याची याजकडे चालऊन हाक लवाजमा सेत घर जे असेल ते याचे याजकडे चालवणे फिरोन बोभाट येऊ न देणे जाणिजे छ ७ मोहरम बहुत[२] काये लिहिणे हे विनंती

श्री
जोतिस्वरूप च
रणी तत्पर माहाद
जीसुत दवलतरा
व शिंदे निरंत
र

मोर्तब
सुद

---

१ येथून अक्षर निराळें. २ येथून अक्षर खुद्दांचे.

लेखांक ५२३-२५ ] १७१८ आषाढ शुद्ध ९ [ अस्सल-मोडी

श्री

·॥ऽ)

श्री
जोतिस्वरूप च
रणी तत्पर माहाद
जीसुत दवलतरा
व शिंदे निरंत
र

मा॥ आनाम देशमुख व देशपांडे पो॥ सिराले यांस दौलतराव सिंदे सु॥ सबा तिसैन मयां व आलफ जानोजी तांबे याणी विदित केले की मौजे खंडाळें पो॥ मजकूर येथील चौगुलकीचे वतन आमचे वडिला वडिलीं आनुभवित आलों आसता दरम्यान पाटलांच्या कलहामुळें वडिल आमचे गांव साडून परागंदा जाहले मागें निंबरुला कुणब्याचें हातें काम चौगुलकीचे गांवकरी घेतात त्यांस ताकीद होऊन आमचें वतन आह्माकडे चालविलें पाहिजे ह्मणोन त्यावरून हें पत्र तुह्मास सादर केलें आसे तरी मौजे मजकूरचे पाटील कुलकर्णी व ‹ांढर आणोन येविसींची चौकसी करून यांची चौगुलकी पाटलाच्या कलहामुळें बंद होऊन दुसरा करीत असल्यास त्याजकडून दूर करून सुदामत प्रो॥ यांची याजकडे चालऊन हक लवाजिमा सेते वगैरे जें पुरातन पासोन चालत आसेल त्या प्रो॥ चालवणे फिरून बोभाट येऊं न देणे जाणिजे छ७मोहरम मोर्तब सुद

मोर्तब
सुद

लेखांक ५२४-२६ ] १७१८ कार्तिक वद्य १३ [ अस्सल-मोडी

श्री

·॥ऽ)

श्री
जोतिस्वरूप च
रणी तत्पर माहाद
जोसुत दवलतरा
व शिंदे निरंत
र

मा॥ अनाम देशमुख व देशपाडे पो॥ सिराले यासी दौलतराव सिदे सु॥ सबा तिसैन मया व आलफ राजश्री जानोजी ताबे मौजे खंडाळे पो॥ मा॥र याचा व संभाजी निबरुले मौजे मा॥र या उभयताचा चौगुली बा॥ कजिया आहे त्यास पेशजी पत्र मांधीयाचे आमलांत पाठविले होते त्यास मोदीयाची तगीरी

१ निराळें अक्षर.

जाली सा। तसे च राहिले त्यास हाली हे पत्र सादर केले आसे तरी या उभयताचा कजिया वाजबी मनास आणून पूर्विंपासून चौगुलकी ज्याची आसेल त्याजकडे चालती करणे येविसीचा फिरून बोभाट येऊ न देणे जाणिजे छ १२ जावल मोर्तब सुद

मोर्तब
सुद

---

लेखांक ५२५-२७ ] [ अस्सल-मोडी

ॐ

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजश्री हरी यादव फौजदार प्रां सिराले यांसी स्नेहाभिळाषी कचेश्वर कृतानंत आसिरवाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहिणें विशेष राजश्री रामाजी गोसांवीं यांसी का। मजकुरी बिघे सा इनाम आहे तरी यांचा इनाम चालविल्यानें इश्वर कल्याण करील आह्मास बहुत अगत्य आहे ह्मणोन लिहिलें असे अनमान सहसा न करणें हे आसिरवाद

मोर्तब
सुद

---

लेखांक ५२६-२८ ] [ अनिश्चित-मोडी

श्री ४

वडिलाचे सेवेसी विज्ञापना विशेष

.......श्रीमन्माहाराज छत्रपति स्वामी याची स्वारी श्री देवाचे दर्शना करिता निबास आली आहे च्यार पाच रोज जाले येक दो रोजात सातारा मु॥ स्वारी आल्यावर जाबसाल पडून काय मजकूर होईल तो मागाहून लेहून पाठऊ ह्मणोन रावजी बावाचे पत्र मलबा आब यास आले त्यात मार या प्रो लि॥ आहे

---

१ निराळें अक्षर.

१ बाबा धाो यास राो खंडोपंत दिवाणजीचे पत्र सातारिया-हून येथे आले त्याचा लाखोटा करून आलाहिदा पाठविले आहे पावलीयाचे उतर पाठवावे

१ सातारा मुकामाचे दरबारचा बदोबस्त राो दिनकरपंत नाना याणी चांगला राखला आहे म्हणोन हैबती सोनवणी याणे जबानीने सांगितले आसे

१ बाठारास देशपांडे मडली आबा देशमुख याज समागमे गेली होती त्याचे व राजश्री मोकदम बावा याचे बोलणे होऊन जाबसाला जाला जे तुह्मी सिरवली श्वस्त आसावे प्रसंगा आन्वये सातारियाचे मुा फड जाल्यास तुह्मास सूचना करू त्या प्राो सातारीयास जावयाचा बेत करावा याप्राो देश-पाडे यास सागोन सिरवलास येण्यास निरोप दिल्हा देश-पाडे येथे आले असेत कलम

१ राो कोंडबा देशमुख इकडील संधानात मिळावयाचा बेत जाला आहे तिकडील नाद सोडून देतो म्हणौन बोलतात काही शुध्धीवर बोलणे दिसते मग काय घडेल पाहावे प्रयत्न चालला आहे कलम

---

येणेप्राो मार ध्यानात आणोन उतर पाठवावे वडसावित्रीचे वाणाचा सरजाम व तेथील मुा खर्चास आज च रवाना कारितो अस्तमान परि-येत येऊन पोहोचेल कलावे राा जेष्ठ शुा १३ सोमवार प्रातःकाल सेवेसी श्रृत होय हे विज्ञापना

लेखांक ५२७ ] [ अस्सल-बाळबोध

॥ श्रीमत्सकल सु + + + + + +

॥ कमल समर्थ + + + + + +

॥ स्वस्ति श्री + + + + + + +

॥ रा पूज्य गुरु + + + + + + +

॥ स्वामिचे सेवेसी

॥ दत्तात्रय गोसावि मठ संस्थान + + + साष्टांग नमस्कार विज्ञापना + + + + थील क्षेम कार्तिक शुद्ध ५ पं + + + + वासर प्रथम प्रहरपर्यंत स्व + + + + + न यथास्थित असे या नं + + + + + जाले स्वामिकडु + + + + + + + + + + + + + + + + + + + + + + + + + + + + + + +

या पुढील ओळी फाटण्यांत गेल्या आहेत. आहेत त्यांपैकीं हि प्रत्येक ओळींतला शेवटचा भाग फाटण्यांत गेला आहे. पत्र अपूर्ण असल्यामुळें विशेष बोध कांहीं च होत नाहीं. मायना पूर्ण असता तरी बरें होतें. हें असें फाटकें पत्र देण्याचा हेतु इतका च कीं, कल्याणांचे बंधु दत्तात्रय यांनीं तें खुद्द श्रीसमर्थांना लिहिलेलें असावें, असें वाटतें.

---

लेखांक ५२८ ] १६२१ [ अस्सल-बाळबोध

श्री

श्रीसद्गुरुभक्तपरायेण राजश्री उधव गोसांवी स्वामीचे शेवेसी वीनंती पोश शंकराजी नारायेण कृतानेक साष्टाग नमस्कार वीनंती येथील ( कुशळ ) जाणौन स्वानंद ले(खना)ज्ञा +[१] + + + + + + + + + + + + + + नीमीत्य करावा या उपरी + + करून सज्जनगडी श्री चें स्थळ आहे येथें येऊन श्री स्वामीच्या पादुकाचें दर्शण घेउन पारणें करावें जें आभीष्ट असेल तें श्री दयेनें सीधीस पावत्तां उसीर काये आहे वीशाद राजेश्री चींतामणी गोसावी

---

१ येथील कांहीं ओळी फाटण्यांत गेल्या आहेत.

वीदीत करीतील त्यावरून अवगत्त होईल लोभ असो दीजे हे वीनंती ॥

| उद्धव आणि दिवाकर यांच्यांत गैरसमजुतीमुळें वितुष्ट येऊन उद्धव
| गोसावी नाशकास जाऊन उपवास करीत राहिले, अशी जी हकी-
| कत ले० १०६ मध्यें दिलेली आहे, तत्संबंधीं च हें पत्र दिसतें.
| त्या लेखांकाच्या अनुरोधानें च या पत्राचा शक दिला आहे.

---

**लेखांक ५२९ ]** १६५६-७५ **[ नकल-बाळबोध**

श्री कल्याण स्वामी

मोक्षश्रीया विराजित श्रीगुरुभजनपरायण राजमान्य
राजश्री लक्षुमण बावा यांसि

प्रति भीमनामने साष्टांग नमस्कार विनंति उपरि येथील क्षेम तागाईत कार्तिक शुद्ध सप्तमि पावेतो येथास्थीत असे यावर आपले शरिरास दोन व + + आराम आहे त्यांत प्रस्तूत सितज्व(रा)चा उपद्रव बहुत झाला आहे तरी (आप)ण श्रीस प्रार्थना करावि जे अराम + + म्हणोन करावि आपले आनंदाचे + + + + लिहित असावे यावरी +[1] + + + +

| श्रीसमर्थ-उद्धव-भीम--शिवराम-रामचंद्र--गोविंदराम--रघुनाथ-
| गंगाराम-नारायण विद्यमान मठपति, अशी या मठाची परंपरा आहे,
| ती, हीं पत्रें वाचतांना, ध्यानांत असावी. उद्धवांचे शिष्य हे भीम
| असतील तर मथळ्यावर कल्याणांचें नांव कां असावें समजत नाहीं.
| हे भीम आणि लक्ष्मण शिरगांव मठाचे असल्यास न कळे.

---

**लेखांक ५३० ]** १६७५ आश्विन वद्य १३ **[ नकल-मोडी**

श्री

( शिक्का )

आज्ञापत्र समस्तराजकार्यधुरंधर विस्वासनिधी राजमान्य राजश्री बाळाजी पंडित प्रधान ता। मोकदम मौजे आगरटाकळी पा। नासिक सुहुर सन आर्बा खमसैन मया व अलफ हरिभक्तपरायेण भीमगोसावी रामदासी

---

१ पुढील दोन चार ओळी तरी फाटल्या आहेत.

वास्तव्य मौजे मजकूर याणी हुजूर कसबे पुण्याचे मुकामी येऊन विनती केली की मौजे मजकुरी श्री देवाचा मठ आहे त्यास पूजेस व मोहोछायास चालवावयाबदल नूतन गाव इनाम करार करून दिल्हा पाहिजे म्हणोन त्याज वरून हे थोर जाणोन देवाच्या पूजाउछाहाबदल मौजे मजकूर इनाम स्वराज्य व मोगलाई कुलबाब कुलकानु हाली पटी व पेस्तर पटी खेरीज हकदार व इनामदार करून यास मौजे मजकूर इनाम दरोबस्त दिल्हा असे तरी तुम्हीं यासी रुजू होऊन मौजे मजकूर इनाम याजकडे चालवणे प्रतिवर्षी नूतन पत्राचा अक्षेप न करणे या पत्राची प्रति लिहून घेऊन असल पत्र भोगवटियास याजवळ परतोन देणे जाणिजे छ २६ जिल्हेज आज्ञा प्रमाण

( मर्यादा )

लेखांक ५३१ ] १६९७ आषाढ शुद्ध १ [ अस्सल–बाळबोध

श्रीरामसमर्थ

श्रीरामदासस्वामी संस्थान चाफळ

लक्ष्मणनाम्ना

समस्त भक्तमंडळी भीमास वास जे स्थळीं
विशेष श्रेष्ठ पादुका तये पदीं चुकूं नका

जनस्थानवासि समस्त सांप्रदाय मंडळी मठ टाकळीकर यासि अनेक अशिर्वाद उपरि येथील कुशळ जाणोन स्वकियें कुशळलेखन करित असिलें पाहीजे विशेष श्री स्वामींचे सांप्रदाई राजश्री उद्धवस्वामीचा मठ टाकळिस आहे तेथील पूर्वी पासून आजिपर्यंत यथानुक्रमें सेवा करित च आलां पुढें हि करावयास सादर आहांत हें ऐकोन संतोष आहे परंतु कोणि कोणि उत्सवादिक प्रथक भजनें आपले घरि करावें ऐसें दिसोन आल्या वरून तुम्हा सर्वास हें पत्र लिहिले आहे तर जितुके उद्धव स्वामिचे शिष्य परंपरागत आहां त्यांस तुम्हा सर्वास तो च मठ मुख्य तेथें समिप आसतां प्रथक भावें भजन केलियां तेथील मर्यादेस उत्तम दिसत नाहीं पुढिल हि चालिस अंतर पडतें येविशई

पुर्वोत्तर ध्यानात समस्तानि आणुन हरयेक विषई अंतर न पडे तें करावें श्री जिचे उत्सव व यथानुक्रमे पुण्यतिथी त्या स्थळि सांग करित असावें आपलाल्या सामर्थ्यानरूप नित्यनैमित्यकाचें साहित्य करावें व तेथें राजश्री रामचंद्र गोसावि आहेत त्यासीं समस्तमंडळि सुधां ऐक्य-भावें वर्तावें येणें करून मठाचि मर्यादा व भगवद्भक्तिचा साभीमान व सांप्रदायाचि शोभा होते येणें कडुन तुम्हास श्रयस्कर आहे हे[1] आसी-र्वाद शके १६९७ मन्मथनामसंवत्सरे आषाड शुध प्रतिपदा बुधवार आसिर्वाद

| पृथक् पृथक् उत्सव करण्यापेक्षां एकत्र होऊन उत्सवादि कार्यें क-
| रण्याची आवश्यकता लक्ष्मणमहाराजांना हि भासत होती.

---

**लेखांक ५३२ |** १७२२ ज्येष्ट वद्य १० **[ नक्कल-मोडी**

| बापु देशमुख धोंगडे देवळालीकर यांनीं महादु माळा मिटा पाटि-
| लकीवर उभा करून मठपतींना जो त्रास देण्याचा क्रम सुरू केला
| होता, त्या बाबतींतलें हें व पुढील पांच ताकीदपत्रें होत.

श्रीसांब

तीर्थस्वरूप राजश्री आपासाहेब वडिलाचे सेवेसी

आपत्य माधवरायाने चरणावरी मस्तक ठेऊन सिरसाा नमस्कार विज्ञा-पना येथील कुशल ताा छ २२ पावेतो वडिलाचे आसिर्वादेकरून सुखरूप असो विशेष श्री हरिभक्तपरायेण भीम गोसावी रामदासी वाा मौजे आगरटांकळी पाो नासिक याजला मौजे माार हा गांव दरोबस्त स्वरा-ज्य व मोगलाई कुलबाब कुलकानु हलीपटी व पेस्तरपटी खेरीज हक-दार व इनामदार करून इनाम कैलासवासी श्रीमंत नानासाहेब यानी श्रीदेवचे संस्थान मठ पुज्या व उछहाबदल देऊन सनदापत्रे करून दिल्ही त्याप्राो भोगवटा चालत आहे हाली बापु देशमुख देवळालकर यानी नूतन पाा माहादजी मिटा उभा करून गावात मनश्वी दंगा

---

१ या ठिकाणचें "हे आसीर्वाद" व शेवटचें 'आसिर्वाद' हें निराळें अक्षर. तें खुद्द लक्ष्मणमहाराजांचें आहे.

करून श्रीदेवाचे पुजारी वो रामचंद्रबावा याची आमर्यादा करून गावचा वसुल सुरळितपणे चालु देत नाही लावणीजुपणीस खलेल करितो याजकरिता मारनिलेचे सिष्य वो गोविंदरामबावा आपणाकडे आले आहेत साकल्यनिवेदन करतील वडिली ध्यानास आणून येविसीचा बंदोबस्त सरकार श्रीमंत पंतप्रधान व श्रीमंत दौलतराव बाबाची निक्षुण ताकीदपत्रे देवऊन पुढे गावचा आमल सुरळित बावाकडे चाले ऐसे करून देविले पो ब्राह्मण स्नानसंध्यासील तपस्वी बहुत थोर संस्थानास योग्य ब्राह्मणसंतर्पण उछाह पुज्या यथास्थित करितात याचे चालविल्यास श्रय:स्कर जाणोन वडिली अभिमान धरून याचे गावचा बंदोबस्त करून देविला पो ब्राह्मण बहुत थोर आदि संस्थान तपश्वी आहे निरोपद्रव होये व दुष्टास सिक्षा होय ते करणे आपणास आहे बहुत काये लिा लोभ करावा हे विज्ञापन

---

लेखांक ५३३ ] १७२२ ज्येष्ठ वद्य १० [ अस्सल-मोडी

श्रीगणराज

चिरंजीव राजश्री नाना शंकर यांसि प्रति देवराव माहादेव आसिर्वाद उपरि येथील कुशल ताा छ २२ मोहरम जाणून स्वकुशल लिहावे विशेष श्रीहरिभक्तपरायण वो रामचंद्रबावायांजकडे मौजे टांकली हा गाव दरोबस्त कुलबाब कुलकानु हालि पटी पेस्तरपटी सुधा खेरीज हकदार व इनामदार करून श्रीमंत कैलासवासी नानासाहेब यानी कैलासवासी वो मीमगोसावी यांचे नावे श्रीदेवाचे पुजेस उछहास इनामी सनदापत्रे करून दिल्ही त्या प्रो भोगवटा चालत आहे गांवचा वहिवाट यांचे हे करितात ऐसे आस्ता हाली बापु देशमुख धोगडे देवलालकर यानी नवीन माहादजी मिटा पाटिलकीवर उभा करून गावचा आमल बाबाकडे सुरळितपणे चालू देत नाही लावणीत खलेल करितो संस्थानाचे पुजारी रामचंद्रबावा यांची आमर्यादा करून मनस्वी वर्तणुक करितो याजकारिता बावानी आपले सिष्य गोविंदराम बावा यांस पुण्यास

पाठविले आहे रा आबा चिटणीस व रा आत्माराम बाबा यांस पत्रे लिहिली आहेत तर तुम्हीं यांची करून देऊन गांवचे बंदोबस्ताची निक्षून पत्रे श्रीमंताकडील व सिंदे यांज कडील देवावी संवस्थान थोर व आम्हांस परम आगत्य यास्तव चित्त पुरऊन काम करावे बहुत काये लिहिणे लोभ कीजे हे आसिर्वाद

लेखांक ५३४ ] १७२२ आषाढ शु. ५ [ नक्कल-मोडी

श्री

नकल

( शिक्का )

मा। अनाम बापूजी देशमूख पो। नासिक यासी दौलतराव सिंदे सुा इहिदे मया तैन व अलफ मौजे अगरटाकली पो। मा।र हा गांव हरिभक्तपरायण राजश्री रामचंद्र बावा गोसावी रामदासी याजकडे श्रीमंताचे सरकारातून इनाम आहे तेथे तुम्ही महादू माली मिठा हा नविन नेऊन ठेविला तो पाटीलकी म्हणौन घर बांधून राहून सेतें जबरदस्तीनें करितो त्याचा यैवज देत नाही व गोसावीयासी आमर्यादा वर्तणूक कारेतो व तुम्ही त्याचे समजाविल्यावरुन दोनसे चोवीस रुो गावचे घेतले आहेत ते देत नाही म्हणोन विदित जाले त्याजवरुन मिठा मा।र याणे बेकैदी केली त्याची चौकसी नासिकर का।दार व प्रहस्त यासी करावयासी सरकारातून लिहिले आहे ते मनास आणितील तुम्ही त्याचा पक्षपात न करिता दोनसे चोवीस रुो घेतले आहेत ते गोसावी बावाकडे माघारे देणे येविसीचा बोभाट येऊ न देणे जाणिजे छ ४ सफर मोर्तब सुध

लेखांक ५३५ ] १७२२ आषाढ शु. ५ [ नक्कल-मोडी

श्री

राजश्री देवराव माहादेव हिंगणे गोसावी यांसि

[१] अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो। दौलतराव सिंदे

---

१ येथून शेवटपर्यंत अक्षर देवराव महादेवांचें.

दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहित जावे विशेष हरिभक्तपरायण राजश्री रामचंद्रबावा गोसावी रामदासी मठ मौजे टाकली पो नासिक याजकडे मौजे मार हा गाव श्रीमंताचे सरकारातून इनाम दरोबस्त आहे तेथे बापूजी देशमुख देवलालीकर याणी माहादुमाली मिठा हा नवीन उत्पन्न करून गावांत आणून ठेविला तो आपली पाटिलकी म्हणौन घर बाधून राहून गावची सेते जबरदस्तीने वाहून साऱ्याचा पैका देत नाही व कितेक प्रकारे दंडेली कारितो गोसावी बावासी आमर्यादा केली त्याचे आपराधाची बेवीस कलमाची यादी याणी आणून समजाविली त्या वरून हे पत्र तुम्हास लिहिले आसे तरी तुम्ही मिठा माली यासी निक्षुण ताकीद करून सदरहु कलमाची चौकसी करून त्याजकडे आपराध लागु जाल्यास त्याजविसी त्याचे शासन करून गोसावीबावाचे सेताचा ऐवज त्याजकडे येणे तो वगैरे नुकसान जाले असेल ते भरून देवऊन पुढे सालसुदपणे वर्तणुक करावी येविसी जामीन घेऊन यासी व याचे गावासी हरयेकविसी खटला न करी असा बंदोबस्त करून देणे रवाना छ ४ सफर सुा इंहिदे मया तैन व अलफ बहुत काय लिहिणे हे विनंती मोर्तब

( सिका )

---

लेखांक ५३६ ] १७२२ आषाढ वद्य ६ [ नकल-मोडी

श्रीगजानन

नकल

राजश्री पाा सरकार निाा सारजाबाई सिंदे गोसावीयांसि

(९) अंखडित लक्षुमी आलंकृत राजमान्य स्नो माधोराव त्रिंबक राजेबहादर आसिर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जाणे विशेष मौजे टाकली प्रो नासिक हा गाव हरिभक्तपरायेण रामचंद्रबावा रामदासी याजकडे इनाम सरकारातून आहे तेथे तुम्ही स्वार पाठऊन मनस्वी उपसर्ग दिला आणि खंडणी मागतात म्हणोन कळले

त्यास या संस्थानास कोणी उपद्रव दिला नाही गाव श्रीरामचंद्रजीचा आहे तुह्मी हि मौजे मजकुरी उपद्रव लोकाचे ऐकिल्यावर देता हे ठीक नाही श्रीमंत रा। दौलतराव बाबा यांची ताकीदपत्रे आहेत की मौजे मजकुरी कोणी येकानी उपद्रव लाऊ नये या प्रो। त्यानी कृपा करून पत्रे दिली आहेत आणि तुह्मी दंगा करावा हे उचित नव्हे याजकरिता लि॥ आहे तरी स्वारास मनाईचिठी पाटऊन बोलाऊन घ्यावे मसाला वगैरे खर्च घेतला असेल तो माघारे द्यावा माहादु मिठा याजला सोड-ऊन द्यावे ऐसी तुह्मी निकड गोसावीबावापासी तुमचे स्वारानी लाविली की माली मजकूर सोडून द्यावा त्यास माली मजकूर याजविसी हे पत्रे श्रीमंत दौलतराव बाबा सिंदे याची आली की माली याची चौकसी करून वाजबीचे रुईने मनास आणून माली याचे सुटका करून द्यावी गोसावीबावाचे स्वाधीन नाही इतकीयावर तुमची मर्जी रवाना चंद्र १९ सफर मोर्तब सुद बहुत काय लि॥ हा आसिर्वाद

---

लेखांक ५५७ ] १७२२ आश्विन वद्य ११ [ नक्कल-मोडी

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोपाळरावभाऊ
व माधवरावभया स्वामीचे सेवेसी

पो गोविंदराव रगनाथ सा। नमस्कार विनंति येथील क्षेम ता। छ २४ जोवल पर्यंत यथास्थित असो विशेष तुम्ही पत्र पाठविले त्यात माहा-दु मिठ्या टाकलीकर याचा मजकूर लिहिला तो समजला यास माहादु मिठ्या + परगावास फिर्याद जावयास निघोन सिद्यावरून जाऊ लागला ते समई सिदेकर पाटलानी मिठ्या मारास राहाऊन रामदास-स्वामीचे सस्थानास पत्र पाठविले की तुमचा कुलबी कोपरगावास फिर्याद जातो यास तुम्ही आपले कडील शाहाणा माणूस पाठऊन सम-जून न्यावे त्याज वरून स्वामीकडील समजुतीस शाहाणा माणूस कोणी आला होता परतु समजूत जाली नाही तेव्हा माहादु मार राहिला

स्वामी असतां समाधिस्थ जाले ते वेळेस कन्हेरीचे गांवकरी याणी अमृतेश्वर स्वामीस पत्र पाठविले कीं पुढे मठास अधिकारी आपण कोण करितात ते करावें त्यावरून स्वामीनी जयराम गोसांवी पहिले भिवाजीबावानीं सिरवलचे मठी ठेवले होते पुर्वी नाव त्याचे बाल जोसी होते ते टाकून जयरांम गोसांवी ठेऊन तेथील मुख्यत्व आम्हास सांगोन जयरामगोसावी यांस पारपत्यगारीचा अधिकार सांगोन ठेविले त्याउपरी अमृतेश्वरस्वामी समाधिस्त जाले याप्रां असता प्रस्तुत जयरामगोसावी आमचे वडीलपण तेथील रक्षित नाही स्वतंतर रितीने वर्तणुक करितात याजकरितां त्यांस पत्र देऊन आमचे वडीलपण पुर्वापार चालत आला या प्रा चालऊन वर्तणुक करीत तें करावें म्हणोन त्यावरून हे पत्र लिहिले आहे तरी अमृतेश्वर बावानीं तुम्हास ज्या प्राा मठाचा अधिकार सागितला आहे त्या प्रा पारपत्यगारीचा अधिकार करावा पुर्ववत प्रमाणे वडीलपणाचा मान पावनगोसांवी याचा रक्षित जाणे रा छ २२ जाखर सुा सलास सबैन मया व अलफ बहुत काय लिहिणे हे विनंती

---

लेखांक ५७४ ] १६९६ कार्तिक व. ९ [ * नक्कल-मोडी

श्री

पावनबोवा

⑤)

मा अनाम देशमुख व देशपांड्ये पो पाटोदे यांसी

सीवाजी विठल सुा पनास[1] सबैन मया तैन व अलफ मौजे चांदगव्हाण पो मजकूर हा गांव सत्यानंदस्वरूप राजश्री यास जातीच्या सरंजामापैकी दिल्हा आहे तर तेथील आमल स्वामीकडे

---

* अगदीं अलिकडचा कागद व नक्कल. १ नक्कलकार अनभिज्ञ दिसतो. 'पनास' च्या जागीं 'खमस' असले पाहिजे.

सालमजकुरापासून देणे हे तेथील अमल करितील याचा बोभाट फिरून येऊ न देणे जाणिजे छ २२ रमजान मोर्तबसुद याची नकल घेऊन हे पत्र भोगवटीयास स्वामीस देणे छ मजकूर

---

लेखांक ५७५ ] १६९६ मार्गशीर्ष शु. १ [ * नक्कल-मोडी

श्रीशंकर

श्रीमंत सत्यज्ञानानंदस्वरूप राजश्री पावन बोवा संस्थान
मठ मर्दे स्वामीचे शेवेसी

चरणरजांकित सीवाजी विठल कृतानेक सास्टांग नमस्कार विनंति उपरी कैलासवासी अमृतस्वामी यांचे मठाचा खर्च पहिला परभारा चालत होता ते कैलासवासी जाहालियावर परभारा चालावयाचे राहिले त्याजवरून तुम्ही आज्ञा केली कीं तुम्ही या संस्थानचा खर्च चालवणे चालविल्याने श्रेयस्कर आहे ऐसी आज्ञा केली त्याजवरून श्री गुरु स्वामीचे संस्थानचा खर्च चालविल्याने आपल्यास व राज्यास श्रेयस्कर आहे असे जाणून सरकारातून आम्हास जातीचे खर्चास जाहागीर प्रमाण पाटोदे येथील गांव दिल्हे आहेत त्याजपैकी मौजे चांदगव्हाण हा गांव दरोबस्त इनाम तनखा रुपये ९७४॥=॥ नउशे साडेचौऱ्याहातर रुपये आडीच आणे खेरीज सरदेशमुखी व हाकदार व इनामदार वजा होऊन बाकी ऐवज होईल तो संस्थानच्या खर्चाचे बेगमीस दिल्हा असे तर तुम्ही स्नानसंध्या ईश्वरभजन करून मौजे मजकूर येथील अमल पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अनुभवित जाणे रोज छ २९ रमजान सु॥ खंमस सबैन मया व अलफ बहुत काय लिहिणे हे विनंती

---

* अलिकडचा कागद व नक्कल.

लेखांक ५७६ ] १६९७ भाद्रपद शु. ७ [ अस्सल-मोडी

श्रीरामचेंद्रजी




( फारसी एक ओळ )

श्रीगुरु विदेहे अमृतेस्वर स्वामी तद्‌भजेणी राजेश्री पाव-
णंबावा गोसावी नाटे हैसगाव प्रा हावली परडां

सेवशी इनामपत्र सके १६९७ मनमथनाम सवतछरे भाद्रपद सुधं ७ सप्तमी शेनवार ते दिवसी गोविंदराव दादाजी मोकदम व सुभानजी वा। सक्राजी व अदोजी वा। चिमाजी पा। काले व गुडाजी कोनेर कुलकर्णी व सिदोजी वां गिरजोजी निरमले व मलकाजी वां केरोजी निरमल व दावलजी वां दरालजी दिवेकर व निबाजी वां बाहेरजी हिवरे व निबाजी वां भानजी वागमोडे विट्ठोजी वां रामजी वायकोले मल्हारजी वां पायाजी मांली व समस्त दाहीजणं मौजे डगपिपरी प्रा मांर सन ११८५ कारणे इनामपत्र लेहून दिल्हे ऐसे जे श्री च्यां उछाहास रामनवमी व नव्येदे नदादीप याजकारिता मौजे मारी जमीन बां खडाले उरा बिघे सुमार ८२१ येकवीस पुर्वेस सिराल वाटे दक्षे-णेस घरकाचे सेते पछेमेस खंडाले उतरेस सीदे येणं प्रमाने जमीन आसे सदरहू लिां प्राने जमीन देवास दिली आसे वौश परंपरा चा-लऊ जागीर बमये सरदेसमुखी व चौथाई व फिस्ती फैज व हाकदारी व गावखर्च वगैरे सुवां दिधले असे यास हिला हरकतं आपणं व आपले वौशेपरांपरां कोन्ही करील तर त्यास आपल्या बेतालीस पुर्वेजाची

श्रीची शेफतं असे हे इनामपत्र लिा सही वली सुमार २५ तारीख छ ६ माहे रजब

निा नागर

बा व्यंकाजी कोनेर कुलकर्णी मौजे मार माहदाजी रघुनाथ जोसी व कुलकरनी मौजे मार रुद्राजी अनंत जोसी कुलकर्णी मौजे मजकूर रघुजी वलद सुभानजी कसबे खडोजी वलद सुभानजी कसबे मौजे दहीठाण प्रा मजकूर

१ मालोजी वलद खंडोजी सीदे पा मौजे लोणी ता सेदरी

१ सभाजी वलद जिसोजी पाटील मौजे वडनेर

१ कानोजी वलद कमलोजी रेड चौगुले मौजे वडनेर

१ निबाजी वलद नागाजी नाईकवाडी किले मजकूर

गोही

१ सक्राजी वलद गिरजोजी निरमले

१ सुभानजी वलद नरसीजी हिवरे

१ कानोजी वलद मलकोजी ठाकलकार मौजे मजकूर रामा वलद सेटी तेली मौजे मजकूर

बलुते

१ बापू वलद विठोबा सुतार मौजे मजकूर

१ बापू वलद कासीबा लोन्हार मौजे मजकूर

+ + + + + + + +

+ + + + + + + + +

१ दाउ वलद कानोजी चांभार

१ मदुभाई वलद तुलाजी मुजावर

१ सकरा वलद बाबानाक माहार मौजे मजकूर प्रा मजकूर

१ दारसा वलद धेडनाक माहार भुजदा वलद केरनाक माहार मौजे मजकूर

१ हसनाक वलद सतनाक माहार

१ पुजा वलद सेट व + +

लेखांक ५७७ ] १६९९ वैशाख व. ५ [ अस्सल-मोडी

( फारसी अक्षरें चार पांच )




( फारसी मजकुराच्या १७ ओळी )

इनामपत्र सके १६९९ हेमलंबी नाम संवछरे वैशाख वद्ये ५ ते दिवसी श्रीगुरु विदेह आंमृतेश्वर तद्भजनी पावनबावा स्वामी स्वामी वडिलाचे सो। चरणरज रघुनाथ विस्वासराव मो व जानोजी बा। हसांजी जगताप पा। व हैबतराव बा। बहीरजी पा। सरंबदे व गगाजी शामराज व राघो त्रिबक कुलंकर्णी व अपाजी हरी सेटे व मिराखान बा। हंजी माहजंण व समस्त दाहीजण मौजे [1] हसैगाव प्रा। हवेली मामले परंडा सन ११८६ कारण इनामपत्र लेहून दिल्हे ऐसे जे श्रीचे संवस्थान मौजे मा।रि आंहे त्यास पुर्वी श्रीसमर्थ होते त्यास देवाचे नंदादीप नव्येद्ये व उछावांस इनाम जिराईत येक पाव पावणेच्यार बिघें ।३॥। व देवाचे पुष्पवाटिकेस मळा दाहा बिघे ८१० येकूण बिघे पावणे चवेतालीस जमीन पुर्वी राजेश्री मल्हार नारायेण मो व समस्त दाही जणांनी दिल्ही ते चालत अली आंहे ते समईची पंत्रे गाहाळं जाली त्यास स्वांमीची मर्जी कीं संवस्थानांस नूतन आपंले नावे इनामपत्र करून द्यावे त्यास पुर्वी वडिली जे चालवीत आलेत त्या प्रा। सेत येक पाव पावणेच्यार बिघे व मळा दाहा बिघें येकूण पावणे चवेतालीस बिघे जमीन दिल्हे जे श्रीमंत राजश्री निबाळकर सा। याचे राज्यांस कल्याण जाणून श्री स इनाम करून दिल्हा सदरहू जमीनीचा भोगवटा पुत्रपौत्रपरंपरागत आनभऊन सर्वत्राचे कल्याण इछावें यांसी कोणीं हिला हरकत करील त्यास श्री कुळस्वामीची व पुर्वजांची शफत

१ कुरुडुवाडीहून लातूरकडे जातांना हसेगांव स्टेशन आहे. तेथें मर्दैमठाखालील एक मठ आहे.

असे हे इनामपत्र लेहून दिल्हें सही छ १७ माहे राखर सदरहू जमीनीचा ताा थळ मिरास येक पाव ।॰ बदल थळ नरसाळे उऱ्ह बिघे ८३।।। पावणेच्यार माळ्याबदल व मळा बिघे ८१० दाहा बदल थळ कुडांचा मळा बागाईत सदरहू जमींनीचे पत्र स्वसंतोश अर्पण केली असे हे इनामपत्र लेहून दिल्हे सही छ मार

( निशाणी नागर )

गोही

१ शाबा वाा सकोजी सुतार

१ सुभान वाा मलकोजी सुतार

१ येमाजी वाा मल्हार लऱ्हार

१ कृष्णाजी वाा रघोजी वतिक

१ गोपाला वाा भिकाजी सोनार

१ बरमाजी वाा नागोजी गुरव

१ खंडोजी वाा विठोजी परीट

१ दावजी वाा माहादजी मुले

१ गंगाजी वाा महिमाजी गुरव

१ विठोजी वाा सिदोजी चाभार

१ नबीभा + + फरीदखान + +

१ गोप माली व केदार माली वाा दाव माली म्हेतर खेर

१ सिवाजी वाा + + कुभार

१ बापूमाली वलद बाजी माली देवकर मौजे माार

१ सुभाना वलद खडनाक माहार

१ पुजनाक वलद सुभनाक माहार

१ माहतारनाक वलद पोमनाक माहार

१ पिराजी वाा दुग्याजी पाा मो मौजे जालगाऊं

गंगाजी शामराज कुलकर्णी मौजे माार

बिाा राघो त्रिंबक कुलकर्णी व जोतिसी मौजे मजकूर

१ गगनाक वलद मलकनाक
माहार

दसखत देशमुख मामले परडा आनंदरावगंगाजी रेणुकादास राजाराम हस्ताक्षर आनंदराव गगाजी दे।। प्रा। हवेली मा।र

---

लेखांक ५७८ ] १७०३ वैशाख शु.१४ [ अस्सल-मोडी

श्री




आज्ञापत्र राजश्री पंत प्रधान ता। मोकदम मौजे मरढें सा।[1] नीब प्रा। वाई सु।। इहिदे समानीन मया व अलफ आंमृतेश्वर स्वामी याजकडेस संस्थानचे खर्चाबदल मौजे मा।रपैकी जमीन बिघे साहा इनाम पुर्वीपासून चालत आली त्यास त्याचा काल जाहाला त्याचे सिष्य पावनबावा वास्तव्य मौ मजकुर याजकडे जमीन चालत आहे असे असतां सालमजकुरी दिकत करितां ह्मणून हुजुर विदित जाहालें त्याजवरून हे आज्ञापत्र सादर केले असे तरी आमृतेश्वरस्वामीकडे संस्थानचे खर्चास सदरहु जमीन इनाम चालत होती त्यास याचा काल जाल्यापासून त्याचे सिष्य पावनबावा याजकडे संस्थानचे खर्चाबदल त्या प्रमाणे जमीन चालत आली असेल त्या बमोजिब[2] चालवणें येविसीचा फिरून बोभाट येऊ न देणे जाणिजे छ १२ जमादिलोवल आज्ञा[3]प्रमाण




---

१ संमत-नजीक. २ प्रमाणें. ३ प्रधानांचें अक्षर.

लेखांक ५७९ ] १७०३ मार्गशीर्ष शु. ५ [ नक्कल-मोडी

श्री

सके १७०३ प्लवनाम सवछरे मार्गश्वर सुध ५ ते दिवसी आनदराव गगाजी यासी सखाराम कोनेर लेहून दिले ऐस जे प्राा हवेली परंडा येथील दरोबस्त देशपाडेपण व चौथा हिसा देशमुखी व मौजे ब्रह्म-गावची मोकदमी व कुलकर्ण येकूण वडिलाच्या वृत्ती च्यार पुर्वापरं चालत आसतां दरम्यान देशपांडपणाचे दसखत रुमाला करिता कजिया वडि-लापासून होत आलें सबब तुम्ही सुभे भागानगर येथं हजरत बद-गान आली साहेब याचे हाजुरात येऊन तुम्हास हाजुर तलब के हाजुर आली यावर परस्पर हाकिकत जाहीर करून इनसाफास दिसगत लागली तों श्री स्वामींचे येण शहारास कार्यानिमित्य जाहाले त्यानी उभय-तास च्यार गोष्टी सागून आण पेशजीचा काहीं शोध पाहून समजा-वीश केली त्याचा तपशील देशपांडेपणीची वृत्ति दरोबस्त की निमे आह्मी ल्याहावी अनभवावी निमे तुह्मी ल्याहावी आनभवावी दसखत मानपान सिरपाव दो जांगा आधि आह्मी मग तुह्मी करावा तपसिल देशमुखीचे गाव सवीस याची वांटणी

| तरफ आनंदराव गंगाजी | तरफ सखाराम कोनेर |
| --- | --- |
| १ मौजे कुरंड | १ मौजे होसगाव |
| १ मौजे रोपळ | १ मौजे सपरी |
| १ मौजे मुगाव | १ मौजे आरणगाव |
| १ मौजे सिराल | १ मौजे देउलगाव |
| १ मौजे देवगाव | १ मौजे येणेगाव |
| १ मौजे दुधी | १ मौजे नेरले |
| १ मौजे सोनारी | १ मौजे जामगाव |
| १ मौजे धारगाव | १ मौजे वगाव |
| १ मौजे वतनापूर | १ मौजे चिचपूर |

| | |
|---|---|
| १ मौजे उडेगाव | १ मौजे अलसद |
| १ मौजे हिंगळगाव | १ मौजे राजोरी |
| १ मौजे ठाकळी | १ मौजे भोगवाडी |
| १ मौजे वाघेगव्हाण | १ मौजे ब्रह्मगाव |
| १३ | १३ |

सदरहू प्रा तेरा गांव मामूल व कुला पासून घेत आलांत त्या प्रा तुह्मी आपला हिसां घेऊन बाकी तेरा गांव तुम्हाकडे चालतेत त्या प्रा घेऊन सविसा गावचे दसखत मानपान सिरपाव तुम्ही करावां दसखतसमधी पा + + वगैरे जे उत्पन्न होईल ते इमान पुरस्कर उभयेतानी निमेनिम ध्यावे देशपांडेपणास वाटणी ता

| आनदराव गगाजी | सखाराम कोनेर |
|---|---|
| २६ विठोजी देशमुख | २६ चत्रोजीचि तरफ |
| २६ आपले दहे सवीस | २६ रेणकादास तरफ |
| ५२ | ५२ |

बाकी दह उरले च्यार ४ देशमुखीची व देशपांडेपणाची वाटणी होऊन ते समाइक आनभवांवे मौजे ब्रह्मगावची मो आधी तुम्हीं मग आम्ही ल्याहाव नाव नागर तुम्ही कराव सिरपाव वगैरे दोघाजणांनीं ध्यावे मौजे मारचे कुलकर्ण येकसाल तुम्ही येकसाल आम्ही ल्याहावे यासिवाय यात्रा सोनारीचा + + + दो ठांई ध्यावा सदरहू प्रा नवी जुनी साधणुक पैकी कमजास्त चुकभुल आसल ते गावास गेलियांवर समजोन बराबर वाटून ध्यावा सदरहू प्रमाण समाधानीन चालले तर उतम नाही तर वृती समधी खर्चवेच जाला तो सावकार आदा जालेयावर दोघानी दो जागा बा ध्यावे हे लिहिले

---

लेखांक ५८० ] १७०३ मार्गशीर्ष शु. ७ [ नक्कल-मोडी

श्रीनाथप्रा

श्रीगुरुविदेह आमृतेस्वरतत्भंजनी पावन गोसावी निरंतर स्वामीचे सों

आज्ञाधारक सखाराम कोनेर देशमुख देशपांडे प्रा हावेली मामले परंडा चार मस्तक ठेऊन सिरसाांनमस्कार विनंति उपरी विज्ञापंना ऐसी जे आह्मी उभयेता देशपाडेपणाचे कजिया करिता आनदराव गगाजी व आह्मी हाज़ुरात होता त्या प्रसगात स्वामीचे येणे भागानगरास कार्यानिमित्य जाले आह्मी उभयेता स्वामी दर्शनास आलो पंरस्पंर वर्तमान निवेदन जाले आह्मास आज्ञा केली तेंव्हा श्रीची सेवा काही घडावी ऐसे मानस जांले त्यासी उभयेतानी विचार करून बहुतेक दिवसचा + + न वौशंपरंपरेंस कल्यान जाणोन येक चावर १ जमीन श्रीस नव्येद्ये नदादीपाकरिता आपण दिली आसे तर श्रीनी वौशापरंपरेंन आनभव घेऊन वोशाचे व वृतीचे कल्यान चितन करावे आन आमचे वोंसीचा कोन्ही हिला हरंकत गोत्रज दायाद करील त्यास श्रीची शफत आसे जमीनीचा तपसील दो + + आद चावर गावास गेल्रियांवर सदंरहू वृत्तिपैकी जमीन येक चावराचे दानपत्र करून भोगवटा करून देऊ यासी आनेथा करू तर श्री कुलस्वामीची शफत आसे हे लेहून दिल्हे सही सके १७०३ प्लवनाम सवछेरे मार्गश्वरे शुध ७ सन ११९१ छ ५ जिल्हेज दर जागा भागानगर दा। बाळाजी कोनेर

---

लेखांक ५८१ ] १६९२ नंतर व १७०५ पूर्वी [ अस्सल-मोडी

श्री

हरिभक्तपरायण राजश्री जयराम गोसांवी + + मौजे कन्हेरी स्वामीचे सेवेसी

सेवक महिपत + + + + वक सां नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीयें लिहित जावें विशेष हरिगुरुभक्तपरायण राजश्री पावनगोसांवी मठ मौजे मरढें यासीं तुह्मीं कन्हेरीच्या मठच्या कारभाराविसीं कजिया करितां यास्तव पावनबावा व तुह्मीं पुणियास आला तेंव्हां उभयेतास सांगितले च आहे की तुह्मीं उभयतानी श्री परलीस जावे तेथे ज्या प्रो ठराव करून देतील त्याप्रों वर्तावें ऐसे सांगितले च आहे त्यास तुह्मी श्री परलीस जावें पावनबावा हि जात आहेत पुणियास आलिया तागाईत पावनबावा परलीस आहे ऐसे ह्मणत आहेत तुह्मीं आधिकाद जात नाही याजकरिता लिहिले आसे बहुत काय लिहिणे हे विनंती

---

लेखांक ५८२ ] १६९२ नंतर व १७०५ पूर्वी [ अनिश्चित-मोडी

श्रीराम

श्रीरामदासस्वामी

लक्ष्मणनाम्ना

श्रीगुरुभजनपरायेण राजश्री पावनबावा मठ मर्ढे यांसी आसिर्वाद उपरी येथील वर्तमान तरी अश्वीन वद्य सप्तमी पर्यंत क्षेमरूप असों यानंतरे अपण पत्र पाठविले तें पावलें व सकल हि अर्थ रा। भिमाजी गोसांवी याणी हि सांगितल्यावरून कलले त्यास रा। जयेराम गोसांवी मठ कन्हेरी हे हि येथे आले आहेत पुणियात च समक्षपणे बोलणे जाहालें परतु दरबारी च कलह उचित नाही यास्तव अह्मी श्री पासीं येतों अपण काये जे सांगाल ते ऐकूं ह्मणून लिहिले त्यास अपण दिपवाली करितां यावें जयराम गोसांवी यासी हि लिहिले आहे ते हि येतील बोलण्याचा अभिप्राये मनास आणून खरें असेल ते च होईल वरकड सकल हि मुखवचने भिवबा सांगतां कलेल त्यास पुर्वील राज-

---

१ येथून निराळें अक्षर

पत्रे व सनदा वगैरे कागद आपणाकडेस आले असतील ते हि माघारे मठी भोगवटीयास त्यांकडेस देवधावे आणि आपणाकडेस नसिले तरी त्याप्रा। उभयेता तेथें आहेत तों च साल जाब उतर याव बहुत काये लिहिणे गावकराच्या व गोसांवीयाच्या पत्राचा नकला पाठविल्याप्रा। पावल्या असल पत्रे पाठविली ह्मणून लिहिलीं परतु आलीं नाहीत समागमे येतील च पुणियांत च रा। कासीबा गोसांवी हि तेथे च आहेत त्यांची आपली भेटी होईल च त्यांचे अपले विचारें उभयतांची समजूत जाहल्यास उतम च अेहे हे आसीर्वाद

---

लेखांक ५८३ ] १६९२ नंतर व १७०५ पूर्वीं [ बहुधा अस्सल-मोडी

श्रीरामसमर्थ

श्रीरामदासस्वामी

लक्ष्मणनामा।

श्रीगुरुभजनपरायेण राजश्री तानकोबा गोसावी यासी अनेक आसिर्वाद उपरी येथील कुशल जाणुन स्वकीयें कुशल लेखन करित असिलें पाहिजे विशेष आपण पत्र पाठविले तें पावोन बहुत समाधान जाहलें व प्रस्तुत शरिरी ही आरोग्यता आहे ह्मणून लिहिले तें ऐकोन संतोष जाहला रा। भिवाजीबावा आले त्याणी सकल हि मुखवचने सांगितले त्यास आपण लिहिल्यावरून भिवबांसी करार करोन घेऊन उभयेतांसहि पत्रे देऊन कासिबास लिहिले आहे परतु खरे असेल त्याप्रमाणे च व्हावें कलह न पडावा हे करणे तुह्माकडेस आहे तुह्मी सूज्ञ च आहांत मग फार काये लिहिणे श्री सतोषे अरोग्यता जाहल्यास + + + देवदर्शन हि + रावें प्रस्तुत बुधि निती रा। पावनबावास सांगोन देवाचे घरी आग्रह व कलह न पडे ऐसे करावें बावाकडील

---

१ ‘ हे हे आसीर्वाद ’ बाळबोधींत. पत्र जुनें आहे पण अस्सल नसावें, असें वाटतें.

मंडळीत अपले घरी प्रमुख उतमं देवाकडील अगत्यवादाचे अपण च अहेत बहुत काये लिहिणे हे' आसिर्वाद

---

लेखांक ५८४ ] १७०६ भाद्रपद व. १३ [ बहुधा अस्सल-मोडी

श्री

श्रीगुरुविदेह आमृतेश्वरस्वामी तभजनी पावण स्वामीचे सेवेसी

चेरणरज जानोजी पाा मोा समस्त दाहीजण मोजे जालगाउ पाा हवेली मामले परडा साां दंडवत विज्ञापण ऐसी जे स्वामीचे संस्थान मौजे हैसगाऊ येथं आहे त्या स्थली देवाचा नैव्येद नंदादीप चालावा याजकरिता सर्वाचे मतें आपल्या आत्मखुशीन थळकाकड जमीन १॥ दीड चावर पैकी इनाम जमीन बिघे ८२२॥ साडेबावीस दिल्हा आसे ते स्वामिनी वंशपरंपरा आनभऊन गांवचें कल्याण व राज्याचें कल्याण जाणऊन हे इनामपत्र लेहून दिल्हे असे याजविशई आमचे वौंशाचा कोन्ही हिला हरकत करील त्यासी कासीयात्रेत मात्रागमन केल्याची सिपत आसे वौंशपरंपरा निभाऊन देऊ हे लिहून दिल्हे सही सके १७०६ क्रोधीनाम वसछरे भाद्रपदे वदे त्रयोदसी सन ११९४ छ २७ सवाल

निाा नागर

गोही

साक्षे राघो त्रिंबक कुलकर्णी मौजे मजकुर

आदोजी वलद माणकोजी पाा सालोखे मौजे मजकूर

मनाजी वलद रामजी पाो सालोखे मौजे मजकूर

बाा गंगाजी शामराज कुलकर्णी मौजे माार

पत्र प्रमाण साक्षे लक्षुमणराव माणकेश्वर कुलकर्णी मौजे मजंकूर

पत्र प्रमाण साक्ष रामचंद्र नारायेण कुलकर्णी मौजे मजकूर

---

१ येथून बाळबोध.

नारोजी वलद बहीरजी पो सा-
लोखे मौजे मार

उदाजी वलद संयाजी पो सा-
लोखे मौजे मार

गुणाजी वलद रघोजी पो कराल
मौजे मार

राणोजी वलद रघोजी पो कराळ
मौजे मजकूर

महिपंति वलदं पिरांजी पो सा-
लोखे मौजे मार

यादवराऊ वलद कुसाजी पो
कराल मौजे मार

सटवाजी वलद मलकोजी सुतार
मुकाम मौजे मार

येमाजी वा मल्हारजी लव्हार
मौजे मार

राणोजी व बेनाजी वा सटवाजी
चांभार हली वस्ती मौजे मार

तुकोजी वलदं नरसोजी वारिक
मौजे मजकुर

सुलतानजी वलद तुकोजी परीट
मौजे मजकुर

२ झाड्या वा पालख्या महार
मौजे मार

१ राणा वा करनाक माहार
मौजे मार

दंताजी वलदं मानाजी पां सा-
लोखे मौजे मार

आपांजी वलद संताजी गावडे
सोनटेक मौजे मार

साक्षे राघो विस्वासराव मो मौजे
हौसगाव

जानोजी वलद दसाजी पा जग-
थाप व सेटियाजी वलद बहीरजी
पा सरवदे मौजे हौसगाव

पत्राप्रमाण साक्ष भगवंत आपाजी
शेटे पेठ मौजे हौसगाव

मिराखान वलद बाजीखान माह-
जण पेठ माज हौसगाव प्रा
हवली मा परंडा

लेखांक ५८५ ] १७०८ ज्येष्ठ व. ४ [ अस्सल–मोडी

श्री

राजश्री वर्तमान व भावी कमावीसदार पो + + +
+ + + वगैरे गोसावी यांसी

[1] अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये श्रो सिवाजी विठल नमस्कार व आ आसिर्वाद सुा सबा समानीन मयां व आलफ श्री गुरु विदेही आमृतेश्वर स्वामी तद्भजनी पावनबावा हे थोर ब्राह्मण श्नान-संध्यासील यासी भजन यथास्थित घडून संस्थान मरढें कृष्णातीर येथील खर्च चालला पाहिजे ह्मणून सालमजकूरी वर्षासन शो १७५ पावणे दोनसे करार करून देऊन हे सनद तुम्हांस सादर केली असे ती प्रो मजकुरी श्रीगुरु विदेही याचे नावे परभारे पटीधरून सहरहू पावणे दोनसे शो हाली सालापासून साल दरसाल पावते करीत जाणे प्रतिवर्षी नवीन पत्रांचा आक्षप न करणे या पत्रांची नकल घेऊन असल पत्र मारनिले जवल भोगवटीयासी देणे जाणिजे छ १८ साबान बहुत काये लिहिणे







---

लेखांक ५८६ ] १७०८ ज्येष्ठ व. ४ [ अस्सल–मोडी

श्री

राजश्री वर्तमान व भावी कमाविसदार पो आष्टे व
सिद्दुर व + ऱ्हा व + छावर गोसावी यांसी

---

१ निराळें अक्षर.

(१) अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये श्री सिवाजी विठल नंमस्कार व आं आसिर्वाद सुा सबा समानीन मया व आलफ श्री गुरु विदेह अमृतेश्वरस्वामी तद्भजनी पावनबावा यासी भजन येथास्थित घडून संस्थान मरढें कृष्णांतीर येथील खर्च चालला पाहिजे ह्मणून साल मजकुरी वर्षासन रुपये २०० दोनसे करार करून देऊन हे सनद तुम्हांस सादर केलीं असें तर पो मजकुरी श्रीगुरु विदेही यांचे नांवे परभारें पटी धरून सदरहू दोनसें रुपये हाली सालापासून साल दर-साल पावते करून कबज घेत जाणे प्रतिवर्षी नुतन पत्रांचा आक्षप न करणे या पत्रांची नकल घेऊन असल पत्रं मारनीले जवल भोगवटी यासी देणे जाणिजे छ १८ साबान बहुत काय लिहिणे







---

लेखांक ५८७ ] [ अस्सल-मोडी

श्रीशंकर

श्रीमत् सत्यज्ञानानंदस्वरूप श्री आमृतेश्वर चरणी तत्पर पावनबावा स्वामीचे सेवेसी

चरणरज सिवाजी विठल कृतानेक सा। नमस्कार विनंति उपरी येथील वर्तमान ता। आस्वीन वद्य ९ मु। पुणे आपले आसिर्वादे येथास्थित असो विशेष आह्मी तिगस्तो मरढ्यास आपले दर्शनास आलो होतो तेव्हा आपण खातग्याचे देवघेवाची गोष्ट काढिली त्याजवरून सदा-शिव खातग्यास पुसिले कीं तु पावनबावाचे गला पडतोस याचे का-

---

१ निराळें अक्षर

रणं काये त्यास त्याणे उत्तर केले कीं ब्रह्मरूप स्वामी याचे पत्र आहे त्याजवरून स्वामीचे सिपारसपत्राचा अर्थ जबानी सांगितला त्यास सिपारसपत्र हर कोणी देत आहे त्याजवरून तुमचे गला पडावें ऐसा अर्थ नाही आह्मी समक्ष सदासिव खातग्यास सांगितले कीं तुह्मा हिसेब कसकसा आहे तो सासवडच्या मु॥ घेऊन येणे ह्मणोन सांगितले असतां तो आला नाही त्यास खातग्याचा कज्या तुह्माकडे नाही व आह्माकडे हि नाही कलावे ह्मणोन लिहिले असें तुह्मी पुण्याचे मु॥ समक्ष असतां हे पत्र लिहिले असे कलले पाहिजे [1]बहुत काये लिहिणे लोभ कीजे हे विनंति

---

लेखांक ५८८ ] १७१० वैशाख शु. १० [ नक्कल-मोडी

श्री

नकल

श्रीगुरुविदेह आमृतेश्वरस्वामी तत्भजनी पावनबावा
गोसावी मठ मौजे मरढे गोसावी यांस

दा॥ बो॥ महिमाजी बिन गणोजी पा॥ मौजे मा॥र व पिराजी बिन राणोजी आतकरी मौजे मा॥र लेहून दिल्हा कागद ऐसा जे निमे तर्फेतील जागा आतकरी मा॥र याजकडील आहे त्या पो॥ पुर्व पश्चम हात सुमार ३५ पस्तीस व दक्षण उतर रुंदी मठाचे आंगे पाया टाकून हात सुमार ३२ बत्तीस ही जागा आपले मठची अडचण जाणोन धर्मार्थे आपणास दिल्हि आसे तरी आपण इमला बांधोन सुखरूप राहावे या जाग्याविसी आपले वौंसीचा कोणी हिला हरकत करील तरी श्रीची शफत आसे शके १७१० कीलकनाम संवछरे वैशाख शु॥ १० हा कागद लेहून दिल्हा सही

निशाण नांगर

---

१ येथून अक्षर खाशांचें

साक्ष

१ रामजी बिन बरवाजी पां॥
मौजे मा॥र
१ रघोजी बिन सुलतानजी
पा॥ मौजे मा॥र
१ दारकोजी बिन खंडोजी पां॥
नागरे मौजे मा॥र
१ सेटी बिन महिमाजी पां॥
मौजे मा॥र
१ हैबती बिन संताजी पां॥
मौजे मा॥र

येणे प्रां॥ असल पत्र भिवराव बलाल याचे हतचे आसे त्याची नकल राघो भिवराव याचे हतची ते पत्र त्याजपासी ठेवा आसे त्याणी कबूल केले जे मौजे मा॥री आलो ह्मणजे देऊ पत्र परलीचे मुकार्मी जाहले आसे श्रीरामदास साक्ष आसेत

बि॥ भिमराव बलाल कुलकर्णी मौजे मा॥र

---

लेखांक ५८९ ] १७१२ कार्तिक व. २ [ नकल-मोडी

श्रीरामसमर्थ

श्रीगुरुविदेह अमृतेश्वर तत्भजनी पावनबावा गोसावी
निरंतर स्वामी स्वामींचे सेवेसी

आज्ञाधारक मोकदम मौजे मरढें प्रांत वांई सम समत नींब सु॥ इहिदे समानीन मयां अलफ लिहून दिल्हा कागद ऐसा जे स्वामीनी आंह्मास जागा मागितला जे मठात आपण राहावयाचें ठीक नाही नाना प्रकारचा उपद्रव होतो त्यासी आमचा बंदोबस्त करावा ऐसा असल्यास जागा द्यावा त्याजवरून समस्त पांढर मिळून कोळी ज्या जाग्यावरी राहातो तो जागा कोल्याचा नव्हे मा॥निलेस जागा दुसरी देऊ त्या

जाग्यावरी आपण सुखरूप इमला बांधोन राहवें पुर्वेस हाद गळी पश्चिमेस श्रीकृष्णा दक्षणेस भिऊंबा जोसी उतरेस बहिरजी पाटील येणें प्रमाणें जागा दिल्हा आसे त्या जाग्याविसीं कोणी हिला हरकत करील आमचे वंसीचा त्यास श्रीची शफत आसे आपण वंसपरंपरेने श्री चे भजन करून पांढरीचें कल्याण इछुन आसावें शके १७१२ साधारणनाम संवत्सरे कार्तिक वद्ये द्वितीया हे पत्र लिहून दिल्हे सही

निशाण नांगर

साक्ष

१ दारकोजी बिन खंडोजी पाटील नांगरे
१ रामजी बिा बरवाजी पाा
१ दारकोजी बिा चांदजी पाा
१ राघोजी बिा सुलतानजी पाा
१ सुलकोजी बिा तुकोजी पाा
१ गुजाजी बिा सेकोजी पाा
१ ह्मालोजी बिा केरोजी पाा इरमाडकर
१ लक्षुमण नाइकजी पाा
१ मोरु बिा तुळाजी सोनार
१ गंगनाक बिा बारनाक

बजंभट कोकिल जोसी
१ बहिरु बिा कासी पाा
१ कोबजी बिा बहिरजी पाा
१ राणु बिा बाजी पाा
१ बहिरजी बिा आंदो पाा
१ तुलसो बिा आंदो पाा
१ राणो बिा महिमाजी पाा
१ हैबाजी बिा संताजी पाा
१ महिपति बिा सेटयाजी पाा
१ पिराजी बिा राणु आतकरी
१ काळु बिा माणकु गोडसा
१ धोंडी बिा सिपडी नाहवी

बिा भाऊंबा जोसी मौजे मजकुर

---

लेखांक ५९० ] १७१९ कार्तिक शु. १३ [ बहुधा अस्सल-मोडी

श्री

श्रीगुरुविदेह आमृतेस्वर तदभज्यनी पावनबावा साहेबाचे सेवेसी

दो बो मौजे मरढे सा नींब प्रा वाई सु समान तिसैन मया व अलफ कारणे कागद लिहून दिल्हा ऐसा जे आपणास कोली राहात होता तो जागा पेशजी आपणास दिल्हा च आहे त्यास कोलीयास घर बाधावया करिता रुपये द्यावयाचा करार रुपये ५० पंनास त्याज पो पेशजी दिल्हे रुपये वीस बाकी राहिले तीस ते साल मारी आपणापासून मारनिलेस देविले येकूण रुपये पनास कोलीयास देविले ते पावले आपण सुखरूप जागा आनभवावी हे लिहून दिल्हे सही मिति शके १७१९ पीगलनाम त्सरे कार्ति शु १३ गुरुवार

नि नागर

साक्ष

१ हरजि बि दारकोजी पा नागरे
१ सुलकोजी बि तुकोजी पा
१ रामजी बि बरवाजी पा
१ सुबाजी बि जानोजी पा नागरे
१ महिपति बि सेटे पा
१ बेहिरजी बि आदोजी पा
१ राणु बि महिमाजी पा
१ हैबति बि संताजी पा
१ माहादजी बि माणकोजी हली वस्ती मौजे मार
१ आनदराव बि लक्षुमणराव सिदे
१ काळी बि सिदोजी ठाकर
१ राणोजी बि सुलतानजी पा

१ भिउबा जोसी मौजे मजकुर
१ बालाजी भिवराव जोसी मौजे मार
१ माणको बाबुराव देशपांडे ता परळी हली वा मौजे मार
१ गोपाल तानदेव जोशी मौजे मरढे
१ भिवराव आपाजी मौजे मजकुर
१ दारकोजी बि चांदजी पा

१ मारोजी बिा तुळाजी सो-
नार मौजे मार
१ सुबा वलद रमनाक माहार
१ सुलताना वळद राघनाक
माहार

बीा सदासिव गोविद निा मोरो खडेराव कुलकर्णी मौजे मार

---

लेखांक ५९१ ] १७१९ कार्तिक शु. १३ [ बहुधा अस्सल-मोडी

श्री

श्रीगुरु विदेह आमृतेस्वर तदभजनी पावनबावा साहे-
बाचे शेवेसी

दाो बो काळु बिा बमनु कोळी व बाळु बिा मल्हार कोळी मौजे मरढे साा निब प्राा वाई सुा समान तिसैन मया आलफ कारणे कतबा लिहून दिल्हा ऐसा जे आमचे घराचे इमल्याचे रुपये ५० पंनास त्यास पेशजी रुपये दिल्हे वीस बाकी राहिले तीस ते साल मार आम्हास गावकरी याणी देविले ते आम्हास पावले रुपये पंनास पावलें मिति शके १७१९ पीगळनाम त्सरे कार्तिक शुा १३ हे लिहून दिल्हे सही

निा तिरकमटा

साक्ष

१ आनदराव बिा लक्षुमण सिदे
१ माहादजी बिा माणकोजी
गोडसे
१ माहादजी बिा सुभानजी
माळी मौजे भुइज
१ रघुजी बिन खडोजी दगडे
निा साठे
१ लक्षुमण बिा बहिरजी गुरव
निबम

माणको बाबुराव देशपांडे ताा
मार लिहिली वाा मौजे मजकुर
भिउबा जोसी मौजे मजकुर
भिवराव आपाजी मौजे मजकुर

लेखांक ५९२ ] १७१९ मार्गशीर्ष व. ९ [ अस्सल-मोडी

श्री




अज दिवाण किले वैराटगड ता। मोकदम मौजे सरजापूर सु॥ समान तिसैन मया व आलफ हरिभक्तपरायेण राजमान्य राजश्री पावनबावा रामदासी संस्थान मौजे मरढे यास सस्थानच्या खर्चास धोडजी बाबर याज + + बि॥ ८१ येक व दिघ्या पैकी बि॥ ८२ येकून बिघे तीन जमीन मौज मार पैकीं दिल्ही आसे त्याप्रा बावाकडे साल दरसाल उपभोग देत जाणे जाणिजे छ २२ माहे जमादिलाखर मोर्तब सुद




---

लेखांक ५९३ ] १७१९ मार्गशीर्ष व. ९ [ अस्सल-मोडी

श्री




अज दिवाण किले वैराटगड ता। मोकदम मौज सरताले ता। कुडाल

सुा समान तिसैन मया व आलफ हरिभक्तपरायेण राजमान्य राजश्री पावनबावा रामदासी संस्तान मौज मरढे यास जमीन मौजे मार पो घोडजी बाबर याचे आसामी बीा ८९ व रखोजी नाईक नीा कबाां बिघे ८३ येकून बिघे बारां संस्थानचे बेगमीस दिल्ही आहे त्या प्राा साल दरसाल बावाकडे जमीनीचा उपभोग देत जाणे जाणिजे छ २२ माहे जाखर मो सुद




---

लेखांक ५९४ ] १७२१ चैत्र वद्य ११ [ अस्सल-मोडी

श्री

हरिभक्तपरायण राजश्री पावनबावा रामदासी संस्थान
मौजे मरढे साां नीब प्राां वाई गाो

(ऽ) आखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्रो रायाजी जाधवराव दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकयि लिहित आसिले पाहिजे विशेष मौजे मजकुरी पुर्वी श्री आमृतस्वामी याणी श्री रामचंद्राच्या मुर्तीची स्थापना करून प्रतिवर्षी रामनवमीचा उछाहाव पुज्या नैव्यद्य व संस्थानचा खर्च करीत आले त्याप्रमाणे तुम्ही हि करीत आहा त्यास तुमचे चालविलीया आम्हास श्रयस्कर हे जाणुन मौजे भोईज साां मजकुर हा गाव आम्हाकडे सरकारातुन इनाम आहे त्या पो पालव्याबदल नजिक मालदेवाची वाडी पो जमीन बिघे १० दाहा जळ तरु तृण कास्ट पाशाण निधि निक्षेप हली पटी व पेस्तर




पटी सहीत खेरीज हकदार करून नूतन इनाम करार करून देऊन हे इनामपत्र तुम्हास करून दिल्हे आसे तरी सदरहु जमीन तुम्ही व तुमचे पुत्र पौत्रादि वौशपरंपरा आनभऊन पुर्ववत प्रो श्रीचा उछाह वगैरे करीत आसावा

संके १७२१ क्रोधनम सवछरे चेत्र वदे ११ छ २३ मोहरमे सुा खमस मया व तैन व आलफ बहुत काय लिहिन हे विनति मोरतब




लेखांक ५९५ ] १७२२ ज्येष्ठ व ७ [ अस्सल-मोडी

श्री

( फारशी अक्षरें )

( फारसी मजकुर तीन ओळी )







श्रीगुरुविदेह आमृतेश्वर तद्भजनी पावन गोसांवी निरंतर स्वामीचे शेवेसी

( फारसी मजकूर पांच ओळी )

नवाब निज्यांम नवा जगबाहदूर सुा सुा सन १२०१० सरकार परंडा सुभे खुनस्ते बुनियाद प्रो मजकुरी[1] हैसगाव येथे श्री स्वामीचा मठ आहे त्यास देवाच्या नैवद्यास व नंदादीपास श्रीरामनवमीचा उछाह व पुण्येतिथी होणे त्यास माहा पुरुष तपश्वी जाणोन श्रीचे भजन चालावयाकरिता देहाये प्रगणे हवेली येथील गावगना सा १ येक दर गावास या प्रो नेमणुक गाव सुमारी तपसिल

| | |
|---|---|
| १ मौजे हैसगाव | १ मौजे रिधोरे |
| १ मौजे पापनास | १ मौजे सेदरी |

१ येथून अक्षर निराळें. रायाजींचें असावें.

१ मौजे उदलाई
१ मौजे हिंगणगाव
१ मौजे पिंपळवाडी
१ मौजे आसु
१ मौजे चाभे पिंपरी
१ मौजे भागेवडी
१ मौजे लाणी
१ मौजे नार्डी
१ मौजे सोनारी
१ मौजे मुगाव
१ मौजे इनगादे
१ मौजे मलकापूर
१ मौजे रत्नापूर
१ मौजे चिचपूर
१ मौजे वडनेर
१ मौजे आवरपिपरी
१ मौजे लहवारे
१ मौजे करंजे
१ मौजे लहू
१ मौजे लऊल
१ मौजे सिराल
१ मौजे रोहसे
१ मौजे आलसुदे
१ मौजे मोत्रे
१ मोजे खानापूर
१ मौजे कुभेज
१ मौजे वाकडी
१ मौजे कादलगाव
१ मौजे येणेगाव
१ मौजे भ्राह्मगाव
१ मौजे जाखले
१ मौजे मुगसी
१ मौजे पिठापुरी
१ मौजे मिरगव्हाण
१ मौजे कंडारी
१ मौजे पारेवाडी
१ मौजे आनाले
१ मौजे उडेगाव
१ मौजे साकत
१ मौजे डगपिंपरी
१ मौजे दगाव खु॥
१ मौजे कपिला पुरी
१ मौजे सिगेवाडी
१ मौजे वघे गव्हाण
१ मौजे कुर्डु
१ मौजे आंबड
१ मौजे आव्हाटी
१ मौजे सालसे
१ मौजे घोटी
१ मौजे जामगाव
१ मौजे भुईज
१ मौजे डोणजे

| | |
|---|---|
| १ मौजे निबगाव | १ मौजे देगाव बुा |
| १ मौजे कुंभेफल | १ मौजे पिपरखेड |
| १ मौजे रानोरी | १ मौजे जाखे पिपरी |
| १ मौजे खासापुरी | १ मौजे रुई |
| १ मौजे दुधी | १ मौजे खासगाव |
| १ मौजे सोनगरी | १ मौजे सरणवडी |
| १ मौजे बावची | १ मौजे बडके |
| १ मौजे आरणगाव | १ मौजे देउलगाव |
| १ काा परंडा | १ मौजे टाकली |
| १ मौजे कातराबांद | १ मौजे कारलें |
| १ मौजे तादुलवांडी | १ मौजे बीटरगाव |
| १ मौजे वाटेफल | १ मौजे लोहकर |
| ४० | ४० |

८०

सदरहु प्राो साल दर साल आदा करून देत जाणे खुदावन नवाब साो याच्या राज्यास व प्राो देहाये मजकुरास कल्याण जाणून सनद करून दिल्ही आसे स्वामींनी आनभत्रोन श्रीचे भजन करून राज्याचे कल्याण इछित आसावे शके १७२२ रौद्रनाम सवत्सार जेष्ट वद्य ७ छ ५ मोहरम

---

लेखांक ५९६ ] १७२७ पौष व. १२ [ बहुधा अस्सल-मोडी

श्री

श्रीमंत राजश्री अन्यासाहेब मोकासी साहेबाचे सेवेसी

दाा बांडे मोकदम मौजे मरढे साा नींब प्राा वांई सुाा सीत मया तैन व अलफ लिहून दिल्हा कागद ऐसि जे पेशजी हरिभक्त राजश्री पावन-

बावा मठ संस्थान मौजे मजकुर यास कोल्याची जागा आह्मी समस्तं पाढरीण कागद वो रा भिउभंट जोसी याचे हातचा करूनं दिल्हां आहे त्याची वहिवाटं पुर्वेसं गली पछेमेस श्रीकृष्णा दक्षणेस वो राजश्री भिउभंट जोसीं उतरेस बहीरजी पां या प्रां जागा देऊन कागद लिहून दिल्हा आहे तो खरा व पुर्डे गोव्यांचे मुकामी स्वामीचे नावे राजश्री महिपतराव भाउ कुलकर्णी मौजे मजकुर याचे हातचा कागद लिहून दिल्हा आहे तो हि खरा आहे कोल्यास पनास रुपये बावा कडून देवऊन कागद मोकदमाचा आहे तो हि खरा आहे कुलकर्णी याची जागा नव्हे आह्मी पाढरीची जागां बावास दिल्ही हे खरें तारीख २६ सवाल पौष वा १२ शके १७२७ क्रोधनाम स.छर

कोल्याचे जाग्याची वहिवाट उतरेस कोल्याचे चांद्येत्र बहिरजी पा याचे खोलीचे आढे आहे तीत पावेतों बावांस जागा दिल्ही आहे कोल्याचे वहिवाटीखेरीज बावास जाग्याविसी समध नाहीं ज्या जाग्यात कोली नादत आला त्या प्रा बावानी इमला बांधावा मधे कुलकर्णी यास खटलां करावयास कारण नाही हाली कोल्याचे वहिवाटीचें आत कुलकर्णी जागा आपली ह्मणोन खटला करितो त्यास कुलकर्णी यास खटला करावयास कारण नाही छ मजकुर हा कागद लिहून दिल्हा सही

निशाण

( नांगर )

व हुजूर साक्ष

१ दारकोजी चांदजी पा

१ सुलक्याजी तुकाजी पा

१ बालोजी सुलतानजी पा

१ निबाजी मानाजी पा

१ दाजीबा जोसी

१ बालोबा जोसी

१ राणु बाजी पा

१ हैबती संताजी पा

१ आदाजी बहिरजी पा

१ दताजी काले

१ मालबा गोडसे

१ मारो लक्ष्मण पा।

१ लक्ष्मण हणमतजी पा।

१ सुलताना वल्द राघनाक

१ जया वल्द सुबनाक माहार

आनदराव सिदे पा। सांळपे हली दामोदर वासदेव कुलकर्णी मौजे
बा। मौ मार उडतरे प्रा। करांड पत्राप्रो
साक्ष आसे

---

लेखांक ५९७ ] १७३२ भाद्रपद शु. ११ [ नक्कल-मोडी

श्री

विनंति मो समस्त दाहीजण मौजे हैसगांव यासी गंगाजी अनंदराव देशमुख देशपांडे पा। हवेली प्रो परंडा सन १२२० कारण मौजे मारी आमचा इनाम चराराईचा आद चावर आहे तो गुरुभक्तपरायेण आत्मारामबावा यासी देविला आहे तर तुह्मी दिकत न करणे जाणिजे छ ९ माहे साबान

---

लेखांक ५९८ ] १७३२ [ नक्कल-मोडी

श्री

यादी प्रतिनिधि यानी धर्मार्थ जमीन मठ मौजे मरढे येंथे मोकदमी-कडून देविले बिघे साठ पैकी वहीत जमीन बिघे तोस चतुसीमा माप दिल्हे बिघे हली इलाई मोजणीचे बाकी पड जमीन बिघे तीस पैकी माल चतुसीमा मोजोन पदरी घातले बिघे ८२३। शके १६६२ पैकी हाली पा। कुलकर्णी यानी बादपेडवला वतनदारी साधली शके १७३२ सत्यप्रमाण सर्वानी धोरण करून अजमासे घेतली गांव जमेस जमीन बिघे ८२।· बाकी मठाकडे जमीन राहिली बिघे ८२१ ऐन जमा बाकी

---

१ पावनबुवांच्या चौघा चिरंजिवांपैकीं एक.

येणे गांवाकडून बिघे ८९ दर बिघा रुपये १ प्रो सध्या कुणबावा वहिवाट चालती त्या प्रो दरसाल रुपये ९ येणे नऊ रुपये द्यावे किंवा जमीन माहुवर बिघे नऊ हालीच्या मापे येणे कलंम

१ गांवकरी पा कुलकर्णी याचे बोलणे हाली आहे जे कमती जमीन मागो नये ऐसीयास प्रतिनिधि यांची बेरीज अंमलाची किती ती पैकी कमी धर्मादाय जमीन मठचे बेगमीस साठ बिघे देविली तो आकार ऐन देणे जो जमा वसुली ऐवज त्यापैकी वजा पडला तो च हली मठाकडे वसूल यावा आणि जमीन गांवकरी यानी वहित करावी घरवहा केली आहे ती साडुन देऊ

६० वहित बिघे तीस रुा२

३० पडबिघे तीस रुा १

प्रा हली मालची वहिवाट

---

लेखांक ५९९ ] १७३३ ज्येष्ठ व. २ [ अस्सल–मोडी

श्री

श्रीमलिकार्जुनस्वामीचा बाा श्रीराचद्र बाा

श्रीगुरु अमृतेस्वर तदभज्यनी श्रीपावन स्वामी माहाराजाचे सेवेसी

अज्ञाधारक मोकदम व समस्त दाहीजण व सेटे माहाजण व समस्त देव मौजे हौसगाव प्रो हावेली मामले परडा सुभे खुदस्ते बुनयाद सन १२२१ अवल साल कारण कागद लेहून दिल्हे ऐसा जे तुह्मी नादावयास जागा पाढरीस मागितली त्याजवरून तुह्मास नादावयास जागा बिछाइती मठाचे लगती वाडियाची हाद पुर्वे पछेम लाबी हात ४४ चेवतालीस दक्षेण उतर लाबी हात सुमार ९२ ब्यानंव ( उतरेस हाद अजगर याचा वाडा ) पछिमेस हाद श्री जीचा बाग

उतरेस हाद श्रीचा बाग दक्षणेस हाद रगारी याच्या साग्या पुर्वेस हात श्री रोकडोबा यणे प्रमाण जागा तुह्मास दिल्ही सुखरूप इनाम बाधून वौशेपरंपरा लेकराचे लेकरी नादणुक करण दरम्यान जाग्या विशेई हार कोणी मुजाईम जाहल्यास जिमा पाढरीचा असे हे कागद लेहून दिल्हे सही छ १५ जमादिलावल ऊर्फ जेस्ट वद्य द्वितीया सके १७३३ प्रज्याहातीनाम सवछरे वली सुमार २३ तेवीस

निा नागर

बाो मल्हार गंगाधर कुलकर्णी मौजे मजकूर

बालाजी रघुनाथ कुलकर्णी जोतीसी मौजे मार

रामचंद्र नारायेण कुलकर्णी मौजे मजकुर

धोंडो कृष्ण जोसी कुळकर्णी

जिवाजी कासीनाथ कुलकर्णी जोतिसी मौजे मार

रगो माहादेव कुलकर्णी जोतिसी मौजे मार

हे पत्रा प्रा साक्ष जोत्याजी वा वेकटराव पाा मो मौजे चिपगाव

बलुते

विठोजी वाा नागोजी सुतार

बाबाजी वाा हैबती सुतार

जोती वाा सताजी नाहावी

राणु वाा गलफाजी गुरव

सताजी वाा भानाजी चाभार मौजे

साक्षे

बापू वाा जानोजी पाा जगताप मौजे मार

बापूजी पाा सरवदे मौजे मार

१ भगवंत आपाजी शेटे

१ हजी वलद मिरखान माहजण

इमाम वाा सुलतानखान माहजण मौजे मार

बहीरजी वाा मल्हारजी पाा जगताप मौजे मजकूर

सुनजी वाा पुजाजी पाा जगताप मौजे मार

सुनजी वाा गोदजी पाा जगताप मौजे मार

जिवाजी वाा भिपजी पाा जगताप

सुभानमाली खोर मौजे मार

सदासिव सोनार पोतदार मौजे मार

गोविंदा निबाळकर पत्रा प्रा साक्ष दाजी व्यंकटेश दलपतराव + +

| | |
|---|---|
| मार | सभा पंदाजी मा + + |
| मोहिदिन वा। अमीण भाई मुलाणा | केदारी कांबळे |
| दारकु वा। माहातारनाक माहार | चेजापा धानवडे |
| देउ वा। कोरनाक माहार | आदांपा येवले |
| धोडो वा। कोडीनाक माग मौजे | सदासिव भोर |
| मार | सुकापा सनगरें |
| अपा वा। जोती माग मौजे मार | |

---

लेखांक ६०० ] १७३४ कार्तिक वद्य ३ [ अनिश्चित-मोडी

श्रीरामसमर्थ

यादी गणेशपंत कारभारी गोळे यांचे यानी पुरसीस केली की पाटील कुळकर्णी ह्मणतात जे मारो जिवाजी यानी धर्मादाव जमीन बिघे आकरा दिल्ही त्याची सनद मोकदमीस ताकीदपत्र आहे किंवा नाही सनद नसल्यास जमीन चालणार नाही सुभ्याचे आमलापैकी जमीन आहे त्या आर्थी गावकरी पाटील याजवर रुो या जमीनीचे देणे पड-तात या + + + आंदो पा। हे हि बोलले की आज ता। जमीन खाली याप्रो कार्ति(क)मासी माहादाजी बाबूराव यांजपासी बोलले त्याचे उतर स्वमुखे खासा बावानी सांगितले स्वामी आस्तां मोरो जिवाजी यांणी धर्मादाय जमीन बिघे आकरा दिल्हे त्यांचे ताकीदपत्र मोकदमीस होते सबब पंनास साठ वर्षे भोगवटा जाहाला हली अंमल इनाम गांव रा। गोळे यांजकडे आहे यांस सरकार संदी अंमल दरो-बस्त करून देऊन चालीस पंनास वर्शे जाहाली त्यानी आज ता। कांही विचारले नाही राजश्री विठलराव आणाजी गांवी येऊन माळचे जमिनी पाहाणी केली परंतु या जमिनीची दिकत घेतली नाही व पा। कुळकर्णी यानी कोणते हि साली दिकत करून खलेल कली नस्तां साल-मजकुरी हिला घेऊन पुणे मु।। येऊन बोलता की आकरा बिघे जमीन

बावाकडे जाजती येणे ऐसीयास सनद दाखऊ आणि मोकदमीची ताकीद असल्यास निघेल गैरवाजवी वहिवाट गांवाकडे जमिनीची जाहालीयास मठचे बेगमीस धर्मादाव नस्ता उगी च पोकलीस खाली-सी चौकसीचे रितीने ठरल्यास जमीन सोडून देऊ पाटलाकडे साठ बिघ्यापौ कमती भरून घेऊ तेरीख छ १६ माहे जिलकाद

१ घोडा चुकारीचा बंडवाल्याचा सुटून रानभरी होऊन मर-ढ्याच्या सिवारात अकल्पीत आत्माराम गोसावी यास साप(ड)ला त्यानी माणसापासून धरून मठि ठेविला होता दोन च्यार महिने बालगला नंतर म्हैसगांवास बावानी घेऊन गेले मागे आंदोजी पा। व त्रिहिरोपंत कुलकर्णी यांनी रास्ते याच्या कारकुनास समजाऊन बावापासून घोडा नेविला किमत रुो दोनसे त्यास दाणावैरण व मोतदार सुधा दर-माहा रुो १५ पंधरा प्रो। चालीस पचेचालीस रुो खर्च आंगावर पाडून आदावत करून घोडा नेविला रास्ते याचा घोडा होता किंवा कोण्हाचा + माग मरढ्यावर आला सबब घोडा देविला किंवा हाकमाचे स्वाधीन केला याचा बयान पा। कुलकर्णी यानी लाऊन घ्यावा कलंम

वा। ३ शके १७३४ सन सलास आशेर मया तैन व आलफ पुणे मु॥ गोले अंमलदार यास समजाविले आसे

---

लेखांक ६०१ ] १७३४ नंतर [ नकल-मोडी

श्री

यादी खासगत पानबावा गोसावी संस्थान मठ मौजे मरढे प्रां वाई येथे जमीन इनाम सरकारी देणे त्यापैकी कमती येणे व पाटील यांनी कबुलात दिल्ही अस्तां जमीनीचा दस्त देत नाही याबा। पुणे मु॥ शके १७३४ मार्गसीर्ष मासी राजश्री नाना गोळे यांस सांगीतले

त्यांनी पाटील बोलाऊन आणून विचारले त्यांजपासी कलमबंदीची याद दिल्ही येणे प्रो

१ स्वामीचा काल जाहाला शके १६९२ + + + साली पाटील यांस विचारले की + + याची जमीन येकदर ·॥११ येक-हातर बिघे गावाकडे सरकार देण्याच्या संदा आहेत ऐसियास त्या जमिनीचा दस्त तुह्मी खंड पांचपंचवीस शो कधी बटा-ईचा गला पांच सात मण देता हे चांगले नाही अमचा इनाम मठचे बेग + + + + + + गांव चालीच्या जमीनी दुम सीम प्रतीच्या आहेत त्यास जमीन पाहून दर दाम आज बिघ्या + त्याजवरून पाटील यांनी पड वहित जमीन बिघे येकेचालीस त्याचा मक्ता शो ४५ पाच साले करार केले त्याप्रो दिल्हे बाकी जमीन तीस बिघे माल वगैरे येणे त्यास पड हाती तिचा इस्तावा खंड शो ५ पाच पाच साले घ्यावे पुढे दर दाम जाजती करून कुल लावणी करावी त्यास बहीरजी पा। याने खुल केले जमीन पाडली साले १८ त्याचा वेव्हार अज ता। सांगत येतो परतु धटाई करून घेत नाही कलम

१ कमती जमीन चकबदीवर येणे बिघे ८७ सात ती अद्याप आह्मास दिल्ही नाही चकबदी पाहून वाजवी तिऱ्हाईत मत जमीन घ्यावीसी जाहाल्यास घेऊ नाही तर मागणार नाही कलंम

१ गुदस्ता पाटील यानी शफत पुर्वक श्री कृष्णेचा तांब्या घेऊन जमीन अजमासे ८२ दोन बिघे घेतली माल पड आहे ती आज ता। गावच्या वहिवाटी प्रो आह्माकडे चालते असे अ-सोन हली खटले करून जमीन घे + + ती आमच्या मापा-तील ऐसी समज अमची त्या अर्थी जमीनीचे माप तिसा बिघ्याचे आमचे पदरी घाल्हून बा। जमीन जाजती असल्यास सुखी घ्यावी ऐसा वेव्हार आहे याची चौकसी चौघाचे मते वाजवी गैर वाजवी पाहून करावे कलम या प्रो लेहून दिल्हे

आहेत त्यातील जाबसाल + + पाहून विल्हे लावावे मिती पौषमास सन सलास आशेर

---

लेखांक ६०२ ] १७३५ [ बहुधा अस्सल-मोडी

श्रीराम

यादी गुरुभगत पावनबावा गोसावी मठ संस्थान मौजे मरढे प्रां वाई याचा बंदोबस्त सरकार तर्फेन होणे येणे प्रा सुम आर्बा आशेर मया तैन व अलफ

१ मठचे बेगमीस जमीन पुर्वीपासून धर्मादाय पंत प्रतिनिधि यांनी दिल्हीं व पंत राजआज्ञा याचे देणे बजिनस पत्रे आहेत

१ प्रतिनिधि याजकडील जमीन बिघे ·॥· साठ चाहूर निमे पैकी चकबंदीत कमी ८७ येणे अस्तां हली पाटील यांस कांही उदभवले त्याजवरून त्यानी वहिवाट चालत होती जमीन त्या पा दोन बिघे हद मोताद जाहाली पेसजी माप करून दिल्ही आणि तिगस्ता घेतली बिघे दोन त्यातील माल गला वैरण कमावीसदार यानी जबरदस्तीने न्हेला येविसी पाटील यासी जाबसाल बोलणे आहे कलंम

१ पंत राजआज्ञा यानी जमीन बिघे ८११ सुभ्याचे अमंल पा दिल्ही त्यातील कमती तीन च्यार बिघे येणे आहे कलम

---

२

१ मोकदमानी समस्त पांढर यानी श्रीच्या फुलेतुलसी करितां जमीन बिघे ८६ दिल्ही त्याची चतुसीमा करून पत्र दिल्हे त्या-अन्वये वहिवाट इ(ना)म अज ता चालती प्रस्तुत पा कुल-कर्णी याचा मतलब उपसर्ग हाकमाकडून आबे लावणीच्या

झाडे साल मजकुरी नेविले सुाार ६०० याचे कारण काय ते विचारावयाचे हाकाम रा। गोले यास कलंम

१ जागा पांढर समस्त यानी श्री स दिल्ही त्या जाग्याची पत्रे करून देऊन निवारसी जागा पाटील यानी नेमणुक चतुसिमापूर्वक दिल्ही अस्ता सालमजकुरी कुलकर्णी याने भिताड पाडावयास उद्योग केला श्री च्या उछाहात दशमीचे दिवसी ब्राह्मणभोजन जाहाल्यावर समजले त्याजवरून हाकमास पुसावयास पो। त्याचे उतर जाहाले तुह्मी व ते जाणा असे समजल्यानंतर मठ सोडून परक्यास्थली गलो कलम

१ मारफत बहीरजी पा। याजकडे जमीन बिघे तीस पो। वहिवाट बिघे ८२३ याचा कुणबावा दर बिघा रु॥ १ प्रो। त्याजकडील येणे ते धटाई करून दस्त न देता दाहा बारा साले भोग्य केले तो पैका हिसेब सुधा येणे कुफराने करितो हली त्याचा पुत्र यास ताकीद करून पैका देवावा त्याचे नाव आंदो पाटील हलो असे कलम

१ हकदारीची माफी आसोन कमावीसदार यानी सुभ्याच्या अमंलदार याचे हाते उपस्त व साल मजकुर दुसाला रु॥ १० घेवविले याचे कारण काय देशमुखीबदल हक पुर्वीपासून मोकदमास माफ

---

लेखांक ६०३ ] [ अनिश्चित-मोडी

श्री

यादी शामजीपंत नि॥ तेलीण + हदा + ई देसी जाहाला त्यासाली वेवस्ता कोणत्या प्रकारीची त्याची खटले हली पुणे मु॥ पाटील बोलतात जे बावानी आह्मावर खर्च पाडला रु॥ ४० येत्रिसीचा बयान येणे प्रो॥

१ प्रथम गांवावर रोखा जाहाला त्याबद्दल बावाचा पुत्र व पाा जाऊन रदबदली करून खडणी केली नंतर कमावीसदार याची सून हि शामजीपंताने धरून न्हेली हजार रुो मागो लागला त्याबदल बावानी आत्माराम यांस व गांवचा बाळाबा वगैरे ब्राह्मणमडली व पाटील जाऊन बावाचा निरोप संस्थानचा पुस्तपणा जाहाला सबब कमावीसदार बाळाजी गुरुनाथ याची सून सोडऊन आणिली उपरांत तिची सासू बाळंतीण होती ती मर्दे मठी दडावयास आली तिला मठातून लाऊन दिल्ही नंतर शामजीपंत हे संस्थानी श्री च्या दर्शनास आले त्यास मेजमानी केली आणि बावानी सांगितले की गांवचा बचाव करावा फारसी खंडणी घेउ येविसी सागु ठेविले वारंवार उ(प)द्रव गावास तुमचा नसावा या प्रो बावानी सागून त्यास मार्गस्त केले कलम

१ दुसरा मजकूर हुजऱ्या १ स्वाभाविकपणे गावात येऊन राहिला मठी येत जात होता पाटील याचे घरी जेवणे खाणे होत होती सर्वाचे अनुमते च होता त्याजवर बहीरजी पाा याच्या घरच्या माणसानी जीव दिल्हा हे वर्तमान शामजीपंतास कळले ज्याने जीव दिल्हा त्याचा भाऊ बाप फिर्याद जाहाला त्या बदल पाटील याजवर रोखा जाहाला खुण भरून द्यावा ऐसे दिसोन आले तेन्हा दोरको पाा यास समागमे घेऊन आत्माराम व तो हुजऱ्या ऐसे बहुत रदबदली करून आदा पाो याचा बचाव केला बहीरजी पाा यास मठी लपविला या प्रो बावाचे क्रत आसे सेपंनास रुो आंतस्त करार केले ते हि बचावले कलंम

गोखले याची फौज सातारीयावर आली शामजीपंत परागंधा जाहाले नंतर बाळाजी गुरुनाथ याचे बायकाने आपला पुत्र गोखल्याकडे पाठऊ(न) कुचाली केली की मरळ्यांत मठी दोन च्यार कुले शामजीपंताकडील आहेत ती धरून देतो आपण

रोखा करावा त्याजवरून त्यानी गांवावर स्वारी पाठविली मठी आले त्यानी कुळाचा शोध तो मठी काही नाही गांवकरी यास मठाविसी जामीन घेऊन आमचे बोलणे जाहाले ते बोलले की ज्या लबाडाने तुह्मांवर स्वारी आणिली तो कमावीसदार सबब खर्च गावावर घेतील गाव तिन्ही लबाड कोण्ही होते आसो बावाचा हात पोहोचल्यास उपकार जाहाले आणि कमाविसदार व पाटी(ल) याचे बचाव केले त्यानी मठावर स्वारी आली त्याचे सुख मानिले खर्च कोण्ही द्यावा याचा परियाय ध्यानात आणून सांगाल तैसे ऐकू कलंम

---

लेखांक ६०४ ] १७४० ज्येष्ठ शु. २ [ बहुधा अस्सल-मोडी

श्री

श्रीगुरुविदेहे आमृतेस्वरस्वामी ततभजेनी पावनबावा निरंतर स्वामीचे सेवेसी

सेवक दारकोजी बिन चादजी पा। सिंगटे सां दंडवत विनंति ऐसि जे आपण पत्र पाठविले जे मल्याचे बादाविसी दक्षेणेकडे आनाजी सिदा सालपेकर खटले करितो ऐसे लिहिले त्यास आह्मी हाली परागंदा आहो मल्याचा बादाचा मातर पेसेजी निंबाजी बिन महिमाजी याने खटले केले होते तेंव्हा रामजी बिन बरवाजी पा। याणी क्रिया केली जे बोढा आपले डागात सगला आहे ऐसी क्रिया जाहाली यास साक्षीस आदोजी बिन बहिरजी व माळु गोडसा व आपण ऐसे होता हे आह्मी ऐकिले आहे त्यानंतर खटले तुटून वहिवाट पेसेजी प्रमाणे आपणाकडे आजपर्यंत चालत आली आहे त्याजवर आपण वोढ्यात विहीर खाणून मोट लाविली देवास तुळसी फुले केली त्या वोढ्यातून पाणी जात होते त्यात आपण बहिरजी बिन अदोजी पा। व भिवराव बलाल कुलकर्णी यास पुसिले की पाणीयास उपाये काये तेंव्हा मा।रनिले

बोलले जे ताल बाधून पाणी दक्षेणेस काढून द्यावे नंतर आपण गावकरी यास बोलाऊन पंनास रुपये देऊन गाडे लाऊन दगड विकत घेतले ताल बाधून पाणी काढून दिल्हे ऐसे आम्हास माहीत आहे हाली आनाजी सिंदा खटले करितो त्यास काही खटले करावयास समंध नाही ऐसे असता उगे च खटले करितो याचा विचार जे धणी असतील त्याणी पाहावा बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंति मिति शके १७४० बहुधान्यनाम संवछरे जेष्ट शुा २ भ्रगुवार

---

लेखांक ६०५ ] १७४० ज्येष्ठ शु. ७ [ अस्सल-मोडी

श्रीनिवास

सरकार दौलतमदार कंपनी इंग्रजबहादूर ताा मोकदम मौजे मर्ढे साां नींब प्राां वाई सुाा तिसा अशर मया तैन व अलफ आमृतबावां यास मजकूरी इनाम जमीन चाहूर

·।२६।।।३।।। श्रीनिवास परंशराम प्रतिनिधि याणी सन इहिदे अबैन सनद चाहूर ·।।· पाो वहिवाट

८११ भवानी शंकरपंत राजाज्ञा सन इसने अबैन

·।।७।।।३।।।

येकूण जमीन अर्धा चाहूर पावणे आठ बिघे पावणे च्यार पांड याची असल पत्रे ठाणे कोरेगावचे मुकामी पाहून मामेलिक केली तरी मशारनिलेचे सिष्य पावनबावा याजकडे वहिवाट चालत आल्या प्राो चालवणे जाणिजे छ ६ साबान सदर लिाा प्राो जरूर करणे रुजू

मोर्तब सुद

बार

लेखांक ६०६ ] १७४१ आश्विन शु. १ [ नक्कल-मोडी

श्री

श्रीगुरु विदेहे अमृतेश्वरस्वामी त:भजेनी पावनबावा
निरंतर स्वामी स्वामीचे सेवसी

चरणरज मुकदम व समस्त दाहीजण मौजे म्हैसगाव प्रों हवेली मामले परंडा सुा सन १२२९ कारणे कागद लेहून दिल्हा ऐसा जे मौजे मजकूरचा इनाम माहाराज राजश्री गंगाजी आनंदराव देशमुख व देशपाडे याचा इनाम देशमुखीचा थल चत्राई चावर १ येक त्यापैकी देशमुखाचा इनाम जमीन ·॥· आद चावर बाकी सोनार पोतदार त्याची जिराईत जमीन ·॥· आद चावर चालत आहे त्यात देशमुखानी आपला इनाम आद चावर तुह्मास श्री जीचे नेवेद्यास देशमुखानी संकल्प करून तुम्हास दिल्हा त्याजवरून तुह्मी आह्मास इनामाच्या पेडवल्याच्या चतु:सीमाच्या हादी दाखऊन देणे म्हणून आज्ञा केली त्याजवरून लाहाण मोठे सर्वत्र पासरीने जाऊन हाद प्राचीन तुम्हास दाखऊन दिल्ही तपसिल जगतापाचे चिकणीपासी चत्राईचे पुर्वेस मुलभासिंग पासून दक्षेण बाजूची हाद सेटीयाचा पेडवला नीट उभा वरता पश्चमेकडे गेला तहद चत्राईचे विहिरी पावेतो तेथून पुढे वरता जिराइति काठ्या सुमार ५० पंनास पाड २॥· आडिच दर काठीचा मोताद पाच हात पाच मुठीचा सिरस्ता याप्रमाणे हाद चत्राईपासून वरती पश्चमेकडे आसे मधी वढा आहे तेथून पश्चमेकडून हाद उतरेची बाजूस खड्या कावल्याच्या उतर सेतची उतरेची हाद तहद लहूवाट जगतापाचे चिकणी पावेतो मुलभासिंगास आली जगताप तहद जगतापापासून लहु वाट पूर्वे आसे तहद आलियाप्रमाणे चतु:सीमा आसेत येणे प्रमाणे चतु:सीमा हादी चहु बाजूच्या चालत आहे याप्रमाणे तुह्मी व पेडवलकरानी चालावे पेडवल्यापासी कोणी हरकत करून पेडवला रगडु नये हा कागद लेहून दिल्हा

सही शके १७४१ प्रमादी नाम सवछरे उर्फ आस्वीन शुा १ प्रतिपदा छ १ माहे जिल्हेज

निशा (नागर)

१ मो बापोजी वा जानाजी पाा जगताप व बापोजी वा पिराजी पाा सरवदे मौजे मार

१ बा भगवंत गंगाधर कुळकर्णी मौजे मार

१ पत्रा प्रो साक्ष लक्षुमणराव माणकेश्वर कुलकर्णी मौजे मार

१ बालाजी रघुनाथ कुलकर्णी मौजे मार

१ जिवाजी कासीनाथ कुलकर्णी जोसी मौजे मार

१ रघुनाथ खंडो सेटे मौजे मार

१ बाजीखान वा मिराखान माहाजण मौजे मार

१ खेत्री वा माहादु उबल मौजे मार

१ व्यंकटराव पाा गाईकवाड मौजे रिभारे

१ धोडजी वा जानोजी पा मो मौजे जाळगाव

१ बावाजी वा हैबती सुतार मौ मार

१ गळफा वा येमाजी लव्हार मौजे मार

१ राणु वा गळफा गुरव मौजे मार

१ आंदु वा कृष्णा कुंभार मौजे मार

१ जोती वा गोपाळ नाहावी मौजे मार

१ मोहिदिन वा आमीन मुलाणा मौजे मार

१ सुभानमाळी खारे मौजे मार

१ नरसमाळी वा वीठमाळी खारे मौजे मार

१ रामा वा सीदनाक माहार मौजे मार

१ दारकु वा सतारनाक माहार मौजे मार

१ सेटी वा सुलताना माग मौजे मार वाघमारे

१ आपा वा जोती माग काबळे मौजे मार

॥ श्रीराम ॥

# श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें

## द्वितीय खंड

## सूची

( बारीक अंक शकांचे व जाड लेखांकांचे समजावे )



## प



## फ



## ब

## स

